सदाशिव अनन्त शुक्ल

卐

# लोक-सिंहासन

चार अंकी

ना ट क

प्राप्ति-स्थल

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर

गोरेगांवकर चाळ, क्र. २ मुंबई ४



मूल्य दीड रुपया

पहिली आवृत्ति
डिसेम्बर १९४६

मुखपृष्ठ
दीनानाथ दलाल





मुद्रक
**वि. पु. भागवत**
मौज प्रिन्टिंग ब्यूरो,
खटाववाडी, मुंबई ४

प्रकाशक
**अ. गो. जोशी,**
झावबाची वाडी, चाळ क्र. २०
ठाकुरद्वार–मुंबई

**सादर समर्पण**

आधुनिक मराठी रंगभूमीचे शिल्पकार
ध्येयवादी कल्पक कलावन्त

**कै. व्यंकटेश बलवन्त**
ऊर्फ
**बापूराव पेण्ढारकर**

ह्यांचे

स्नेह-स्मृतीस

# निवेदन

'शापित सिंहासन' ह्या माझ्या नाटकाचें लिहून पडून राहिलेलें हस्तलिखित जवळजवळ एक तपानंतर जसेंच्या तसें छापलें जाऊन 'लोक–सिंहासन' ह्या नांवानें आज प्रकाशांत येत आहे.

माझ्या इतर सर्व नाटकांप्रमाणेंच हें नाटकहि मी नाट्यसंस्थेच्या मागणीवरूनच लिहिलें पण ह्याला रंगभूमीचें द्वार दिसण्याचा सुयोग लाभला नाहीं. योगायोगच तसा घडला.

महाराष्ट्र–कोकिळ श्री. शंकरराव सरनाईक ह्यांच्या 'यशवंत संगीत मंडळी'च्या मागणीवरून ह्या नाटकाचा आराखडा मी १९२९ मध्यें तयार केला. पण मग पौराणिक नाटकाची मागणी करून १९३३ च्या डिसेंबरमध्यें माझें 'सत्याग्रही' नाटक 'यशवंत मंडळी'नें रंगभूमीवर आणून अत्यंत यशस्वी केलें आणि प्रस्तुत नाटक लवकर लिहून पूर्ण करून देण्याबद्दल लकडा लावला. म्हणून मी ह्या नाटकाचे दोन अंक लिहून काढले. पण १९३५ च्या मे मध्यें श्री. सरनाईकांनीं आपली संस्था बंद ठेवतांच माझ्या नाटक–लेखनांतहि खंड पडला.

त्यानंतर १९३६ मध्यें ललितकलादर्श मंडळीचे मालक, माझे मित्र कै. बापूराव पेंढारकर ह्यांनीं अकल्पितपणें माझ्याकडे प्रस्तुत नाटकाची मागणी केली. आणि इंदोर–ग्वाल्हेरकडील दौरा आटोपून मुंबईस आल्यानंतर प्रथम हें नाटक व ह्याच्याच पाठोपाठ माझींच दुसरीं दोन सामाजिक नाटकें रंगभूमीवर आणण्याचा आपला मनोदय व्यक्त केला. म्हणून मोठ्या उत्साहानें मी हें नाटक लिहून पूर्ण केलें. पण ता. १५ मार्च १९३७ रोजीं श्री. पेंढारकर ग्वाल्हेर मुक्कामीं वारले आणि सारेंच स्वप्न विरलें !

त्यानंतर दोन नाट्यसंस्थांनीं ह्या नाटकाची मागणी केली. परंतु अनुरूप नटसंच आणि आर्थिक स्थैर्य ह्यांच्या अभावीं सध्यांच्या नाटकधंद्याच्या एकंदर परिस्थितींत, नाट्यविषयानुरूप नेपथ्य-रचनेच्या दृष्टीनें खर्चाचें ठरणारें हें नाटक त्या संस्थांच्या स्वाधीन करण्यास माझेंच मन घेईना. म्हणून मी त्यांना नकार दिला.

नाट्य हें भिन्नरुचि लोकांचें एकमेव समाराधन असून हाच एक वाङ्मयप्रकार सर्वस्वी लोकाभिमुख आहे. उत्कृष्ट नाटकाची कसोटी म्हणजे तें पाहायला व वाचायलाहि उत्तम असावें, हें जरी खरें असलें तरी नाटक म्हटलें कीं तें मुख्यत: रंगभूमीवर प्रयोगरूपानें पाहण्यासाठींच असतें; वाचनालयांत बसून केवळ वाङ्मयदृष्टीनें वाचण्यासाठीं नसतें हेंहि तितकेंच खरें आहे. कोणत्याहि नाटकाची यशस्विता त्याचा प्रयोग पाहूनच पडताळायची असते, अशा मतांचा मी प्रथमपासूनच असल्यानें माझी सर्व नाटकें मी त्याच दृष्टीनें रंगभूमि डोळ्यासमोर ठेवून लिहिलेलीं आहेत. परंतु प्रस्तुत नाटक रंगभूमीवर आलें नसल्यानें ह्याचें प्रयोगदृष्ट्या यशापयश कळण्यास व प्रेक्षकांचें मत प्रत्यक्षच अजमावण्यास मिळण्यास मार्ग नाहीं. मात्र पुस्तकरूपानें हें प्रसिद्ध झालें असल्यामुळें चिकित्सक नाट्यसमीक्षक वाङ्मयदृष्ट्या ह्याचा यथोचित परामर्ष घेतील अशी मला आशा आहे.

श्रीसमर्थ-सदन, मुंबई ४ **सदाशिव अनन्त शुक्ल**
ता. १८-१२-४६

## : पात्रें :

[ प्रवेशाच्या अनुक्रमानें ]

तारिणी

राजबहादुर

रंगराज

शक्तिसिंह

संजय

धनंजय

धारिणी

कामिनी

संजीवनी

वज्रांग

वज्रसार

इंद्रजाल

कृतांतराय

चंडपाल

शिवाय लोकनायक, शिपाई.

---

॥ श्रीजनता–जनार्दनाय नमः ॥

# लोक–सिंहासन

## १

राजमंदिर—युवराज संजयाच्या वाढदिवसाचा समारंभ. सरदार, मानकरी, नागरिक नजराणे घेऊन आले आहेत. सुवासिनी पंचारत्या घेऊन उभ्या आहेत.

**तारिणी** : चला, ओवाळा पंचारत्या! ती पाहा, युवराजांची स्वारी आलीच!

**राजबहादुर** : कुमार धनंजय अन् महाराणी धारिणीदेवीहि युवराजांच्या बरोबर आहेत!

**रंगराज** : अन् कामिनीदेवीहि आहेत—

**तारिणी** : ह्या मंगल कार्याला जिवंत अपशकुनच तो!

**राजबहादुर** : हो. पण तुला जिवंत राहायचं असेल तर असं भलतंच बरळूं नकोस.

**शक्तिसिंह** : स्वाऱ्या आल्याच ! बोला, युवराज संजय महाराजांचा जयजयकार !

[ सर्व लोक जयजयकार करतात. संजय, धनंजय, धारिणी, कामिनी वगैरे प्रवेशतात. सुवासिनी संजयाला पंचारत्या ओवाळतात.

**सर्वजण** : युवराज संजय महाराजांचा जयजयकार !

[ पडद्यांत—बंद करा ! हा जयजयकार बंद करा !

**संजीवनी** : ( प्रवेशून ) बंद करा ? युवराजांचा जयजयकार बंद करा ? ही कुणाची अमंगळ द्वाही ?

**धारिणी** : युवराजांचा जयजयकार बंद होणार नाहीं ! प्रजाजन हो ! युवराजांचा जयजयकार मुक्तकंठानं करा ! ही धारिणीदेवी तुम्हांला अधिकारवाणीनं आज्ञा करीत आहे—

[ सर्वजण जयजयकार करतात. पडद्यांत—पूर्वोक्त.

**वज्रांग** : ( प्रवेशून ) जयजयकार बंद करा ? अशी अभद्र घोषणा करणारा कोण तो राजद्रोही कुलांगार—

**वज्रसार** : ( दुसऱ्या बाजूनें प्रवेशून ) हा वज्रसार ! हा वज्रसार बजावीत आहे—बंद करा हा जयजयकार ! बरखास्त करा हा समारंभ !

**वज्रांग** : कोण ? वज्रसार !

**धारिणी** : ह्या वज्रांगांचा रक्तामांसाचा सख्खा बंधु !

**वज्रसार** : होय. प्रधान वज्रांगांचा सख्खा बंधु आणि ह्या पातशाही तख्ताचा, सम्राट् कृतांतरायांचा बंदा गुलाम !

**वज्रांग** : अरे निमकहराम ! अशा बंदीची बेजबाबदार द्वाही फिरवणारी तुझी पापी जिव्हा झडून कशी पडली नाहीं ?

**वज्रसार** : इंद्रजाल सेनापतीसाहेबांच्या सक्त हुकुमाच्या ताबेदारींत ती गुंतून गेल्यामुळं !

**संजीवनी** : काका ! हा कसला हुकूम ? हा तर अरेरावीचा अत्याचार !

**वज्रांग** : आणि तो कोणता राजनिष्ठ जीव जुमानणार ?

**शक्तिसिंह** : बोला ! युवराज संजय महाराजांचा जयजयकार !

[ सर्व जयजयकार करतात. तोंच इंद्रजाल प्रवेशतो.

**इंद्रजाल** : खबरदार ! हा समारंभ ताबडतोब बरखास्त झालाच पाहिजे.

**धारिणी** : इंद्रजाल ! आज तुमच्या दृष्टीवर अधिकाराची धुंदी चढली, कीं आपल्या जबाबदारीची तुम्हाला विस्मृति पडली ? हे मग्रूर शब्द तुमच्याच तोंडून बाहेर पडत आहेत काय ?

**इंद्रजाल** : नाहीं ! राणी सरकार, माझ्या मुखावाटें महाराजांचा हुकूमच—

**संजीवनी** : महाराजांचा हुकूम ?

**वज्रांग** : पण महाराजांनीं असा हुकूम फर्मावण्याचं कारण ?

**इंद्रजाल** : हा प्रश्न माझ्याच काय, पण प्रधानजी, आपल्याहि अधिकाराबाहेरचा आहे. नेकजात नोकर आपल्या अन्नदात्याच्या केवळ हुकमतीलाच विकलेला असतो—

**धारिणी** : पण इंद्रजाल, ही धारिणी, असल्या अत्याचारी जुलुमशाहीला झुगारून हा समारंभ निर्विघ्नपणें पार पाडण्याची प्रतिज्ञा करीत आहे !

**इंद्रजाल** : महाराणी सरकारांचा हा दुराग्रह अनिष्ट आहे.

**कामिनी** : वहिनी, बोलूं नये पण आतां बोलतेंच मी. भलत्याच भरीला पडून प्रत्यक्ष महाराजांच्या आज्ञेची अवज्ञा करणं तुला शोभत नाहीं.

**धारिणी** : बस्स करा वन्सं ! एकूण, ह्या कुटिल कारस्थानांत तुमचंहि अंग आहे तर !

**कामिनी** : कारस्थान कसलं कपाळाचं ! पतीच्या शब्दाचं मोल पत्नीनं कांहींहि केलं तरी बहिणीला आपल्या भावाच्या शब्दाची किंमत विशेष वाटत असते हो !

**इंद्रजाल** : प्रधानजी, समारंभ बरखास्त झालाच पाहिजे. ह्या सक्त हुकुमाच्या अंमलबजावणींत दाखविलेली दिरंगाई धोक्याची आहे !

**वज्रांग** : सेनापतीच्या सत्तेपुढें निमूटपणें नमण्यासाठीं प्रधानपदाची प्राणप्रतिष्ठा खास नसते !

**इंद्रजाल** : सेनापतीच्या सत्तेपुढं नव्हे, परंतु महाराजांच्या, ह्या अखिल देवावर्ताच्या सम्राट्–सत्तेपुढं तरी...

**संजय** : ह्या संजयाच्या मस्तकानं नम्र झालंच पाहिजे. धारिणीदेवी, महाराजांच्या मर्जीविरुद्ध माझ्या जन्मदिवसाचा हा समारंभ साजरा करण्याचा दुराग्रह कां धरतां ?

**धारिणी** : केवळ सत्याच्या संरक्षणासाठीं ! हा समारंभ साजरा झालाच पाहिजे.

[ लोक जयजयकार करतात.

**संजय** : बंद करा—माझा जयजयकार बंद करा ! वाढदिवसाचं हें उसनं आनंद-वैभव कोणत्या मानी मनाला रुचणार ? वाढदिवस ! जन्मदिवसाचं प्रतिवार्षिक पुनरागमन म्हणजेच वाढदिवस काय ? मनांत कर्तव्यजागृति करून जो दिवस जन्माची सार्थकता करील तोच खरा जन्मदिवस !

**इंद्रजाल** : राजबहादुर, समारंभ बरखास्त झाल्याची बाहेर सर्वांना वर्दी दे ! वज्रसार, ह्या नागरिकांना राजवाड्याबाहेर घालवून दे ! आणि उभयतां सरकारस्वाऱ्यांना घेऊन उदईक शिकारीला जाण्याची सिद्धता कर.

**वज्रसार** : आज्ञा सरकार—

[ ' अन्याय '–' अन्याय ' असें ओरडत नागरिक निघून जातात.

**संजय** : इंद्रजाल, माझी मनस्थिति नीट नाहीं. शिकारीला जाण्याची माझी इच्छा नाहीं.

**इंद्रजाल** : पण महाराजांची तशी इच्छा आहे ना ? शिकारीला गेलंच पाहिजे.

**संजीवनी** : इंद्रजाल, हुकुमाच्या ताबेदारीनं जीभ जखडून गेली तरी अंतःकरणानं सौजन्य सोडण्याचं काय कारण ? प्रत्येक शब्द तुमच्या कठोर, ओंगळ अंतःकरणाची साक्ष देत आहे.

**इंद्रजाल** : ( संजीवनीकडे क्रोधानें पाहून धारिणीस ) ह्या कर्तव्यनिष्ठ इंद्रजालाच्या कठोरतेला महाराणीसरकारांनीं क्षमा करावी. वज्रसार, युवराजांना घेऊन चल !

[ इंद्रजाल धारिणीला प्रणाम करून जातो. त्याच्या पाठोपाठ कामिनीदेवी, वज्रसार, संजय, धनंजय, शक्तिसिंह वगैरे जातात.

**संजीवनी** : काय हा अकल्पित प्रकार ! साराच चमत्कार ! बाबा, देवांचं दैवी तेज ओसरलं कीं पृथ्वीवर सैतानांचं साम्राज्य पसरलं ?

**वज्रांग** : बाळे, अशीच युवराजांच्या पाठोपाठ जा. त्यांच्याशीं चार प्रेमळ शब्द बोल...

**धारिणी** : खरंच जा बाळ. तेवढाच त्याच्या कष्टी जीवाला विरंगुळा पडेल. ( संजीवनी जाते ) वज्रांग, ह्या एकंदर अघटित प्रकाराला म्हणावं तरी काय ?

**वज्रांग** : इंद्रजालाच्या कपटनाटकाची नांदी ! दुसरं काय ?

**धारिणी** : इंद्रजालाच्या कृष्णकारस्थानाचं निर्मूलन नाहीं का करतां येणार ?

**वज्रांग :** महत्त्वाकांक्षेच्या मदिरेनं महाराजांची दृष्टि धुंदारली आहे आणि इंद्रजालाच्या मायावी मोहजालानं त्यांच्या भोळया बुद्धीला विलक्षण भुरळ पाडली आहे. महाराजांची खास मेहेरनजर म्हणूनच हा शेंदाडशिपाई असा सेनापतीपदाला चढला आहे. इंद्रजाल करील ती पूर्वदिशा, अशीच सारी अपूर्व परिस्थिति आहे. आणि त्याच्या कारस्थानांत कामिनीदेवी सामील !

[ गवाक्षांतून इंद्रजाल, कामिनीदेवी व कृतांतराय कुजबुजत असलेले दिसतात.

**धारिणी :** तिकडून तर त्या दोघांच्या विवाहाचा वाङ्निश्चय करण्यांत आला आहे. वन्सं तर काय, आजकाल माझ्यावरहि हुकमत गाजवूं पाहातात.

**वज्रांग :** त्यांच्या नाहक बडेजावीमुळंच दरबारांतसुद्धां इंद्रजालाचं प्रस्थ फार माजलं आहे. पण विषारी विंचू मांबाच्या पिंडीवर बसला तरी त्याची पूजा पैजारांनींच बांधावी लागते.

**धारिणी :** साऱ्या साम्राज्याचीं सूत्रं इंद्रजालाच्या साहाय्यानं वन्संच आपल्या हुकमतीनं हालवीत आहेत...

**वज्रांग :** आईसाहेब, प्रसंग पडलाच तर महाराजांच्या भोंवतीं गिधाडी वृत्तीनं घिरघिरणारीं हीं धुंगुरटीं चिरडायला हा वज्रांग समर्थ आहे.

**धारिणी :** तुमच्या सत्यनिष्ठेवर भिस्त ठेवूनच मी निर्धास्त आहें. इडापिडा टळो आणि संजयाचं अमंगल दूर पळो !

**वज्रांग :** सत्याचा पाठीराखा परमेश्वर आहे. हा वज्रांग प्रसंगीं प्राणांचीहि आहुति देईल आणि युवराजांच्या सिंहासनाचा मार्ग निष्कंटक करील !

[ कृतांतराय इंद्रजालासह प्रवेशतो.

**कृतांत :** निष्कंटक करणार ? संजयाच्या सिंहासनाचा मार्ग हे वज्रांग निष्कंटक करणार ! पण हा कृतांतराय चार दिवसांच्या आंत तो युवराजमुकुट कुमार धनंजयाच्या मस्तकावर चढविणार त्याला ते काय करणार ?

**धारिणी :** ( सखेद आश्चर्यानें ) काय ? धनंजयाला युवराज्याभिषेक होणार ?

**कृतांत :** होय. पण हें ऐकून तुम्हाला वाईट कां वाटावं ?

**इंद्रजाल :** ही शुभ वार्ता ऐकून महाराणीसरकारांना मोठा आनंद होईल असं आम्हाला वाटलं होतं...पण अनुभव उलटा आला...

**कृतांत :** आणि लाडक्या लेकाचं भाग्यवैभव न पाहवणाऱ्या एका राक्षसी मातेचं उलटं काळीज मात्र दिसलं !

**धारिणी :** महाराज, पतीच्या पापी विचारांना वाचा फुटलेली पाहून कोणत्या आर्य-स्त्रीचं अंतःकरण दुःखानं दुभंगून जाणार नाहीं ?

**कृतांत :** माझे विचार पापी ? पापपुण्याच्या खुळचट कल्पना बावळ्या बायकी बुद्धीलाच सुचायच्या. संजयाऐवजीं माझ्या धनंजयाला राज्याभिषेक करणं...

**वज्रांग :** धडधडीत अन्याय-अधर्म आहे हा ! महाराज, सम्राट् शौर्यसिंधु महाराजांनीं ही साम्राज्यलक्ष्मी युवराजांसह आपल्या स्वाधीन केली. सम्राटांच्या विश्वासांतले कर्तबगार अमात्य आपण, म्हणूनच अल्पवयी, पोरक्या संजयमहाराजांची आणि ह्या देवावर्ताच्या अनाथ राजलक्ष्मीच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांनीं अंतकाळीं आपल्यावर सोंपविली. ह्या साम्राज्याचे केवळ पालनकर्ते प्रतिनिधि आपण—

**कृतांत :** मग संजयाच्या लालनपालनाची जबाबदारी मीं झुगारून दिली आहे का ? जसा मला माझा धनंजय तसाच संजय !

**धारिणी :** पण संजय सज्ञान होतांच त्याला राज्याभिषेक करण्याचं वचन विसरून...

**कृतांत :** वचन ? शौर्यसिंधूच्या तळमळत्या आत्म्याला तात्पुरती शांति मिळावी म्हणून तसं वचन मीं दिलं असेल कदाचित् ! नाहीं असं नाहीं. पण राज्यक्रांतीचं राजकारण तसल्या वेड्या वचनांचा विचार कधींच करीत नसतं. म्हणे वचन ! दिलंय् कुणी अन् ऐकलंय् कुणी ?

[ शक्तिसिंह प्रवेश करतो.

**शक्तिसिंह :** ह्या शक्तिसिंहानं !—ह्या शक्तिसिंहानं आपलं वचन ह्या कानांनीं ऐकलं आहे. सरकार, हा सत्तर वर्षांचा शक्तिसिंह आपल्या वचनाचा जिवंत साक्षीदार आहे. पंधरा वर्षांपूर्वींचे मरहूम महाराजांचे मरणघडीचे शेवटचे शब्द आणि आपलं वचन ऐकायला हा त्यांचा खास दिमतीचा हुजऱ्या जातीनं हजर होता. महाराज, देखता डोळां अनाचार पाहवत नाहीं. बोलल्याविना राहवत नाहीं. ह्या थकल्या जिवाची हिताची बोली भलीबुरी कशीहि माना. इमानी सच्चेपणाला भल्याबुऱ्याची भीडमुर्वत नाहीं. पण .. महाराज, सेवाचाकरींत सारी हयात राबवून अखंड वांकल्या मस्तकानं ज्याचा मान ठेवायचा, त्याच सिंहासनाच्या पायरीला स्वार्थाची हांव धरून पाय लावायचा ? महाराज, महाराज, अन्नदात्याशीं बेमानी करून बदनामीचा डंका

अलम् दुनियेंत कां वाजवितां ? आमच्या बाळधन्याचं हक्काचं राज्य बळकावून देवावर्तीच्या दीनदुबळ्या प्रजेवर अन्यायाची रावणशाही कां गाजवितां ?

**कृतांत** : तुमच्या बाळधन्याचं राज्य ? संजयाची प्रतिष्ठा माझ्यापुढं ? माझ्या अन्नावर वाढलेला...

**शक्तिसिंह** : होय. दिल्या धडुतावर आणि घातल्या घांसावर पोसलेला तोच पोरका पिंड आम्हां कोट जीवांचा पोशिंदा परमेश्वर आहे !

**इंद्रजाल** : शक्तिसिंह, पोकळ पांडित्याची मशाल पाजळून महाराजांचा क्रोध भडकवूं नकोस. महाराजांच्या मेहेरनजरेनं इतमाम वाढविला, त्यांच्या उदार हातानं डोक्यावर सरदारीचा शिरपेंच चढविला तरी हुजऱ्या तो हुजऱ्याच ! हुजूरशीं हुज्जत घालणारी ही नालायक नादानी—भरमसाट-पणानं बरळणारी ही पागल बेमानी—

**शक्तिसिंह** : हां ! सेनापतिसाहेब, जीभ आवरा. सत्तेपुढं शहाणपण चालत नाहीं, पण इमानी जातिवंताची जीभ कधींच खोटं बोलत नाहीं. लक्षांत ठेवा. ह्या शक्तिसिंहाच्या इमानीइतबारीनं स्वतःच्या लायकीची दखलगिरी धरली आहे, म्हणूनच हुजऱ्याचा हुद्दासुद्धां त्याला मानकऱ्यापेक्षांहि मोठेपणाचा वाटतो. पण चालत्या बेबंदशाहींत तुमच्यासारखे हांजीखोर हलके हुजरे मात्र हुजूरवरतीहि हुकमत गाजवीत गांजल्या गरिबांचे कर्दनकाळ बनले आहेत. हां.... हात आवरा. तरवारीच्या धाकानं दबून जाणारा मी नव्हे...

**इंद्रजाल** : असल्या राजद्रोही रामोशांचीं ताठलेलीं मुंडकीं धडावेगळीं केल्याखेरीज धडगतच नाहीं.

**शक्तिसिंह** : अरे जा ! हा म्हातारा जीव मरणाच्या मार्गांतला मुशाफिर झालाच आहे–पण अगोदर...

**कृतांत** : चूप् ! मगरूर थेरड्या, वाचाळ जिभेला वेसण घाल. नाहीं तर पुढल्याच शब्दाबरोबर गर्दन खची होईल !

**शक्तिसिंह** : फिकीर नाहीं. पण हा सच्चा जीव मान तोडली तरी इमान सोडणार नाहीं !

**कृतांत** : इंद्रजाल, ह्या हैवानाला हद्दपार करा. ह्याच्या घरादाराची वाटेल तशी विल्हेवाट लावा. मग हा मुर्दाड थेरडा मुड्याच्या मोलानं जगांत जगला काय किंवा मेला काय, सारखंच आहे.

**शक्तिसिंह** : ज्याच्यासाठीं जगांत जगायचं तेंच मरणानं मिळाल्यावर ह्या नाशवंत कुडीची काय कदर ? स्वामिनिष्ठेचं समाधान मनाला आणि नेकीचं नांव जनाला पटल्यावर प्राणांची पर्वा कुणाला ? पण कृतांतमहाराज, हा शक्तिसिंह जगेल तोहि युवराजांच्यासाठीं आणि मरेल तोहि युवराजांच्यासाठींच !

**इंद्रजाल** : शिपायांनों, ह्याच्या मुसक्या बांधून ह्याला येथून घेऊन चला.

[ शिपाई येऊन शक्तिसिंहाला धरूं लागतात.

**धारिणी** : थांबा ! महाराज, हद्दपार करण्याइतका शक्तिसिंहाच्या हातून गुन्हा तरी कोणता घडला ?

**इंद्रजाल** : गुन्हा असो वा नसो; सरकारच्या दृष्टीला धोकेबाज दिसणाऱ्या राजद्रोह्यांना...

**वज्रांग** : राजद्रोही ? शक्तिसिंह राजद्रोही !

**इंद्रजाल** : शिपायांनो !...

**धारिणी** : खबरदार शक्तिसिंहाच्या अंगाला हात लावाल तर !

**इंद्रजाल** : ( शिपायांस ) बांधा मुसक्या !

**शक्तिसिंह** : ( गहिवरून ) आईसाहेब, आईसाहेब, ह्या नोकरीच्या नरकां-तून अनायासें माझी सुटका होत आहे, त्यांत असा अडथळा कां आणतां ? देवते, आजवर आमच्या बाळधन्याला आईच्या आंतड्यानं जिवापाड जतन केलंस. असंच अखंड त्याच्यावर मायेचं पांघरूण घाल. तो बाळजीव तुझ्या ओटींत देवावर्ताच्या दैवानं निष्ठेनं निरवला आहे. म्हाताऱ्या डोळ्यांत आसवं उभीं राहतात. मनींच्या उसळत्या उमेदी तुझ्या औदार्याकडे निर्वाणीच्या भरवशानं पाहतात. माउली, ऊर दाटून आल्यामुळं बोलवत नाहीं. ह्या तुझ्या दोन पावलांच्या पुण्याईची सांवली सोडून तापल्या जिवाला दूर चालवत नाहीं. पण संपला—आज आपला लागाबांधा संपला ! देवते, देवते, आजपासून तुझ्या सेवाचाकरीला अंतरलों ! आजवरच्या उण्याअधिकाची माफी मागून तुझ्या पवित्र पायावर हा अखेरचाच माथा ठेवतों ! ( धारिणीच्या पायांवर डोकें ठेवतो. )

**कृतांत** : घेऊन चला ह्या नादानाला !

[ शिपाई खेंचून नेऊं लागतात.

**शक्तिसिंह** : ( शिपायांस ) चला व्हा दूर ! आपखुषीला जबरदस्तीची काय

जरूर ? कृतांता, हीच माउली ह्या मायदेशाची मंगलदेवता आहे. ह्या पुण्य-देवतेच्या पायीं माझीच काय पण, राजा, तुझीसुद्धां गर्दन झुकली पाहिजे रे ! हा इंद्रजाल म्हणजे विषारी कालभुजंग ! ह्याला गळ्यांत बाळगून ह्या साध्वीच्या उपदेशाला झुगारशील तर रौरवाचं साधन करशील ! याद राख. देवावर्ताच्या सिंहासनाचा दरोडेखोर...धर्मनीतीचा मारेकरी...

[ असें ओरडत असतां शिपाई त्याला घेऊन जातात.

**कृतांत** : ह्या कंगाल कुत्र्याच्या हटवादीपणाला हद्दपारीची साधी सजा बस्स आहे.

**वज्रांग** : पण गरीब जीवावर ही जुलूमजबरी चांगली नव्हे.

**कृतांत** : माझा जरब बसवण्यासाठीं हें जबर शासन आहे.

**धारिणी** : संजयाच्या जन्मदिवसाचा उत्सव—समारंभ बंद पाडला, त्याला शिकारीला धाडला—

**कृतांत** : मग त्यांत तुमचं काय बिघडलं ? सर्व कांहीं माझ्याच मर्जीनुरूप घडलं. संजय म्हणजे ह्या कृतांताच्या हातांतलं खेळणं आहे हें प्रजेला पटविण्यासाठींच...

**धारिणी** : पण त्यामुळं प्रजेचीं मनं प्रक्षुब्ध होऊन चोहोंकडे असंतोषाची लाट उसळली तर...

**कृतांत** : तर काय ? प्रजेचं भय कुणाला ? प्रजेसाठीं राजा नसून राजासाठीं प्रजा आहे !

**धारिणी** : हा भ्रम आहे. भक्तांच्या भाविकतेनं देवाला देवपण आणलेलं असतं; त्याचप्रमाणं प्रजेच्या राजनिष्ठेनंच राजाला राजेपण दिलेलं असतं !

**कृतांत** : मी सत्ताधारी सार्वभौम राजा आहे. माझ्या तरवारीची कर्तबगारी जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत पागल प्रजेची कदर मीं कां करावी ? शौर्य-सिंधूच्या पश्चात् माझा दरारा सर्वदूर बसवितांना माझ्या धोरणाविरुद्ध प्रजेनं कांहीं कमी चळवळ केली नाहीं ! पण त्या चळवळ्या प्रजेला निःशस्त्र करून तरवारीच्या धारेवर धरतांच माझ्या मुलतानी सत्तेपुढं एखाद्या मवाळ मेंढरा-प्रमाणं ती नमलीच कीं नाहीं ?

**वज्रांग** : पण केवळ तरवारीच्या जोरावर बळकावलेलीं सिंहासनं अढळ राहूं शकत नाहींत !

**इंद्रजाल** : पराक्रमी पुरुष तरवारीच्या टोंकानंच राजमुकुट उचलून स्वतांच्या डोक्यावर चढवितात !

**वज्रांग** : पण क्रूर समशेरीच्या जुलुमी शक्तीनं सांवरलेलीं सिंहासनं शेवटीं स्वतांसकट मातीलाच मिळतात !

**कृतांत** : पर्वा नाहीं. गगनाला गवसणी घालणाऱ्या ह्या कृतांताच्या महत्त्वाकांक्षी कर्तबगारीला असलीं लाखों सिंहासनं धुळींतून निर्माण करतां येतील.

**धारिणी** : होय ना ? मग संजयाचं हक्काचं राजपद हिरावून घेण्याची अघोर आकांक्षा कशाला धरायची ?

**कृतांत** : स्वराज्यशकट हिंमतीनं हांकारायला संजय अद्यापि अपात्र आहे, असं आम्हाला वाटतं म्हणून !

**धारिणी** : पण आपणाला वाटतं तें जनतेला कुठं पटतं ? अन् संजय अपात्र आहे; मग धनंजय तरी पात्र आहे का ?

**वज्रांग** : राणीसरकारांच्या सरळ सवालाला महाराजांची महत्त्वाकांक्षा काय जबाब देणार ? अखेर अधःपातालाच कारण होणारं आसुरी महत्त्वाकांक्षेचं पापी पाऊल मर्यादेबाहेर जाऊं देणं धोक्याचं आहे !

**कृतांत** : (चिडून) वज्रांग, ही शाब्दिक शहाणपणाची शिकवण मला नको आहे. पुरे कर या वायफळ वल्गना. तुझीसुद्धां कारस्थानी महत्त्वाकांक्षा मी ओळखून आहें. तुझी मुलगी संजीवनी संजयाची वाग्दत्त वधू आहे...

**वज्रांग** : शौर्यसिंधु महाराजांनींच माझ्या संजीवनीला युवराजांची वधू नेमस्त केलेली आहे.

**कृतांत** : शौर्यसिंधूच्या ईच्छेची बेगडी जोड देऊन तुझ्या कारवाईला साळसूद स्वरूप देण्याची ही मखलाशी पुरे कर. शौर्यसिंधूनं संजय-संजीवनीच्या बाबतींत पाळण्यालाच बाशिंग बांधण्याचा पोरखेळ केला असला तरी तूं आतां गुडघ्याला बाशिंग बांधून कृष्णकारस्थानाच्या खाईंत उतावीळ उडी घेऊं नकोस. तुझी महत्त्वाकांक्षा कधींच सफल होणार नाहीं.

**वज्रांग** : माझी महत्त्वाकांक्षा ?

**कृतांत** : संजयाला राज्याभिषेक होऊन तो सम्राट्सिंहासनावर आरूढ होईल. तुझी मुलगी सम्राज्ञीच्या तोऱ्यांत त्या अर्ध्या सिंहासनावर बसेल आणि सार्वभौमाचे सासरे म्हणून मोठ्या मानानं तुला जगांत मिरवायला मिळेल !

बोल, ह्याच मुर्दाड महत्त्वाकांक्षेच्या मृगजळामागं धांवत सुटून संजयाचा पक्ष उचलून धरण्याचं कारस्थान तूं आरंभलं आहेस ना ?

**वज्रांग** : मुळींच नाहीं.

**धारिणी** : हें कल्पनेचं तर्कट परिस्थितीनं खरं भासविलं तरी तें वस्तुस्थितीला विसंगत आहे.

**वज्रांग** : कारस्थान हेंच नांव द्यायचं असेल तर युवराजांच्या सिंहासनाच्या शत्रूंना शासन करून अन्यायाला पायबंद घालणं हेंच ह्या प्रधान वज्रांगाचं पवित्र कारस्थान आहे !

**कृतांत** : प्रधान वज्रांग–! प्रधानपदाच्या अधिकाराचा तोरा तुला कशाला ? ह्या क्षणापासून तुझीं प्रधानगिरीचीं वस्त्रं मी इंद्रजालांना अर्पण करीत आहें.

**वज्रांग** : ही गुलामगिरीची बेडी हा वज्रांग ह्या क्षणींच तोडून टाकीत आहे. संपत्तीची आणि अधिकाराच्या तुकड्यांची हीन लालसा लांगूलचालन करणाऱ्या लोभी कंगालांना ! सिंहाचा छावा श्वानांच्या पंक्तीला कधींच बसत नसतो ! कृतांतराय, तुमच्या राक्षसी राजसत्तेला आणि चाकरीच्या ताबेदारीला हा वज्रांग आज असा अखेरचा रामराम ठोकीत आहे !

[ मजुरा करून आवेशानें निघून जातो.

**कृतांत** : इंद्रजाल, जा—त्या कारस्थानी कुत्र्यावर नीट पाळत ठेवा—

**इंद्रजाल** : जशी आज्ञा !

[ मजुरा करून जातो.

**धारिणी** : महाराज, महाराज, काय आरंभलंत हें ? वज्रांग कारस्थानी नाहींत. पाताळयंत्री नाहींत...

**कृतांत** : मला माहीत आहे.

**धारिणी** : मग हा अविचार कशासाठीं ?

**कृतांत** : ह्या कृतांताच्या जाणत्या बुद्धीचंच हें सारं राजकारणी रहस्य आहे.

**धारिणी** : पण त्या रहस्याला सत्यनिष्ठ वज्रांगांचा बळी कां बरं देतां ? मी तुमचे पाय धरतें...

**कृतांत** : चल दूर हो. माझ्या मुत्सद्दी दूरदृष्टीच्या धोरणाला तुझ्या बायकी बुद्धीचं बंधन घालूं बघशील तर तें मी अस्सं झुगारूनच देणार !

[ लाथाडून जातो. पडदा.

[ २ ]

रंगराजाच्या गळ्यांत हात टाकून राजबहादुर मोठ्यानें हंसत प्रवेश करतो.

**रंगराज :** अरे, हें काय हसणं कीं हंसण्याचं सांग ? असं ओक्साबोक्सीं हसतां हसतां हर्षवायु होऊन पटकन् प्राणसुद्धां जायचा !

**राजबहादुर :** गड्या रंगराजा, मला वाटलं होतं कीं, माझ्या कुंडलींतले सारे शुभ ग्रह बालग्रहाच्या रोगानं बिचारे लहानपणींच लुळेपांगळे पडले. पण नाहीं ! इंद्रजालाचा-त्या पापग्रहाचा ग्रह माझ्याविषयीं उत्तम आहे. तेव्हां हा राजबहादुर बडा अधिकारी होणार असाच त्या बेस्या ग्रहांचा आग्रह, नव्हे अनुग्रह दिसतो. दोस्त, आज मी तुरुंगावरचा अधिकारी झालों. बोल, हा अधिकार मला कुणी दिला ?

**रंगराज :** इंद्रजालप्रधानजींच्या इच्छेवरून महाराजांनीं दिला.

**राजबहादुर :** मूर्ख आहेस ! हा अधिकार खुषामतीच्या प्रचंड पराक्रमावर मी स्वतां कमावलेला आहे.

**रंगराज :** खुषामतीचा पराक्रम ?

**राजबहादुर :** अलबत्. खुषामतीची विद्या म्हणजे एक अजब चीज आहे !

**रंगराज :** पण ह्या चिजेचं चीज नेहमीं होतंच असं नाहीं.

**राजबहादुर :** अरे, दुनियेंत अशी एकहि चीज नाहीं की जी, ह्या खुषामतीच्या रामबाणानं हस्तगत होत नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वरसुद्धां स्तुतिस्तोत्रांनीं ऊर्फ खुषामतीनंच खूप होऊन आपल्या भक्तांवर दया दाखवीत असतो. खुषामतीखेरीज भाग्याची बढती होत नाहीं रे बाबा !

**रंगराज :** खरं आहे. तूं मात्र इंद्रजालासारख्या अरेरावी अधिकाऱ्याच्या मर्जीला पात्र...

**राजबहादुर :** आणि तूं मेषपात्र म्हणून त्यांच्या मर्जीला अपात्र ! आतां एखादं नखरेल, खुबसुरत पात्रच असतास...

**रंगराज :** काय बोलतोस हें ?

**राजबहादुर :** खरं तेंच बोलतोंय्. हो, पण आधीं दूर हो, दूर हो...

**रंगराज :** जवळच्या जिवलग दोस्ताला दूर लोटतोस ?

**राजबहादुर :** अरे मूर्खा, सरकारी खात्यांत खाजगी दोस्ती जमेला धरायची नसते. एरवीं आपण गळयांत गळे घालून फिरलों तरी सरकारी संबंध आला कीं अशी गळचेपीच केली पाहिजे. ( गचांडी देऊन दूर लोटतो. ) ...कारण, कनिष्ठांची मान मुरगळल्याखेरीज वरिष्ठांचा मान वाढत नसतो.

**रंगराज :** ( जवळ जाऊन ) अरे, पण राजबहादुर,...

**राजबहादुर :** हां ! दूर–दूर उभा राहा. माझ्या नांवानं मला हांका मारतोस ? कनिष्ठांनीं वरिष्ठांच्या नांवानं हांका मारायच्या पण त्या तोंडावर नव्हे, माघारीं ! तूं माझ्या हाताखालचा अन् अशा एकेरी नांवानं मला हांका मारल्यास तर माझ्या नांवलौकिकाला बाध येईल ना ?

**रंगराज :** पण नांवापुरती दोस्ती दाखवायला काय हरकत आहे ?

**राजबहादुर :** अरे, नांव कशाला काढतोस नांवापुरत्या दोस्तीचं ! आज-पासून लक्षांत ठेव—मी रंगराज असं पुकारलं कीं तूं मला ' महाराज ' असं आदबीनं म्हणायचंस ! रंगराज !...

**रंगराज :** म–हा-र्रा–ज ! छे बुवा ! नाहीं जमत हें.

**राजबहादुर :** कां रे ? लाज वाटते होय ? खुषामतीचा धडा गिरविण्यासाठीं असा जिवाचा धडा तुला केलाच पाहिजे, जनामनाची लाजलज्जा कोळून प्यालीच पाहिजे. अन् काय रे, उभा जन्म तूं सरकारी नोकरींत गमावलास; तरी अजून वरिष्ठासमोर नीट उभंसुद्धां राहातां येत नाहीं तुला ? नीट आदबीनं उभा राहा. नाहीं तर पाहा, उभा फोडून काढीन ! चल, बैस तिथं. ( रंगराज मटकन् खालीं बसतो. ) अरे वा ! तूं तर ऐसपैस जेठाच मारलास कीं ! चल ऊठ, उभा रहा ! बेशिस्त, बेशरम...

**रंगराज :** आपणच महाराज...

**राजबहादुर :** चूप ! बोलूं नकोस. निर्लज्ज, नालायक...

**रंगराज :** आपणच महाराज...

**राजबहादुर :** आपणच महाराज काय ? मी निर्लज्ज, नालायक ?

**रंगराज :** तसं नव्हे. आपणच महाराज मला बसायला सांगितलंत...

**राजबहादुर** : बरं मग ? लागली लहर, म्हटलं बैस. पण तुला कांहीं शिस्त ? आम्हां सरकारी अधिकाऱ्यांच्या लहरी क्षणाक्षणाला बदलत असतात. अधिकाऱ्यांच्या लहरी ओळखून वागतां येत नाहीं, त्यांची मर्जी सांभाळतां येत नाहीं तो सरकारी नोकर कसला ? चल, हो चालता. पण थांब. मुजरा कर पाहूं [ रंगराज मुजरा करतो. ] अरे, अरे, बेट्या, काय रे हें ? कपाळावर हात मारून घेऊन रडतोस कीं मुजरा ठोकतोस ? सरकारी नोकरीला नालायक आहेस अगदीं. तुला साधा मुजरा ठोकायची अक्कल नाहीं....चांगला ठोकून काढला पाहिजे तुला. [ मारूं लागतो. ]

**रंगराज** : अहो, असं ठोकण्यापेक्षां मुजरा कसा ठोकायचा तें सांगा ना.

**राजबहादुर** : दोन्ही हातांनीं ठोकावा लागतो....

**रंगराज** : काय ?

**राजबहादुर** : शंखा, शंख नव्हे ! मुजरा ठोकावा लागतो. हा पाहा मुजरा ! जी हुजूर...जी हुजूर...[ पाठीमागून तारिणी येते. तिला धक्का लागतो. लगेच तिच्याकडे वळून ] जी हुजूर...जी हुजूर...

**तारिणी** : जी हुजूर ! जळ्ळा मेला ! हा हांजीखोरपणा अगदीं हाडींमासीं खिळलाय् !

**राजबहादुर** : बायको, रंगराजाला सरकारी शिस्तीची तालीम देत होतों. खुषामतीची पांसष्टावी कला पढवीत होतों. अग, करतेस कसं ? खुषामतीचे पाठ तोंडपाठ करून घेतांना...

**तारिणी** : ह्यांची अशी पाठ रगडून काढलीत वाटतं ?

**राजबहादुर** : अधिकाराचा अंमल असाच गाजवावा लागतो.

**तारिणी** : अधिकाराचा अंमल खूपच चढलेला दिसतोय खरा ! काय पण थाटमाट ! केवढा रंगरुबाब ! उसनी ऐट सरदारी आणि भीक मागा दारोदारीं ! नुसता मेला तोंडपुजेपणा...

**राजबहादुर** : तूं तर माझी तोंडावर पूजा बांधायला लागलीस !

**तारिणी** : बायकोपुढं डाळ शिजत नाहीं तर नवऱ्यानं निदान मूग गिळून तरी स्वस्थ बसावं !

**राजबहादुर** : बस्स ! तोंड सांभाळ. नोकराचाकरांदेखत माझी अशी अब्रू

घेतेस ! जिभेचा पट्टा बंद करतेस कीं तरवारांचा पट्टा सुरू करूं ?

[ तलवार उपसतो.

**तारिणी** : लग्नांत माझ्या हातांत हात दिलांत तो असा हातोहात माझा गळा कापायला वाटतं ?

**राजबहादुर** : लगीनघाई केली म्हणून तर हा असा हातघाईचा प्रसंग आला. तुझ्याशीं लग्न करून तसे चार हात केले–आतां तुझ्याशीं असे चार हात करायला हा मर्द डरतो कीं काय ! मी शूर आहें ! वीर आहें...

[ उगाच तरवार फिरवितो.

**तारिणी** : ( अंगावर धांवून ) दाखवा पाहूं आपलं शौर्य !

**राजबहादुर** : ( घाबरून, मागें सरून ) थांब, दाखवतों. पण जागची हालूं नकोस. आणि प्राण गेला तरी बोलूं नकोस !

**तारिणी** : कां ? कां बोलूं नको ? शौर्य थिजलं वाटतं ? असा थरकांप कां सुटला अंगाला ?

**राजबहादुर** : हा थरकांप भीतीचा नसून क्रोधाचा आहे. माझं शौर्य भयंकर आहे. पण बायकोपुढं शौर्य प्रकट करणं छातीच्या वीराला लांछनास्पद आहे. म्हणूनच मी ह्या वेळीं शिस्तवार माघार घेत आहे ! ( तरवार म्यान करतो. रंगराज हंसतो. ) शिस्त चुकलास ! रंगराज, शिस्त चुकलास ! मालक रडकुंडीला आला तरी नोकरानं असं खदाखदां खिदळायचं नसतं ! ( तारिणी हंसते. ) अन् जो कायदा नोकराला, तोच बटकीसारख्या बायकोला !

**तारिणी** : पुरे. पुरे. अगोदर डोळ्यांचं पाणी पुसा.

**राजबहादुर** : डोळ्यांचं पाणी ? ज्याच्या अंगांत पाणी नसेल तो डोळ्यांतून पाणी काढील !

**तारिणी** : ( हात ओवाळीत ) आहाहा ! काय पण बहादुरी !

[ हंसत हंसत जाते.

**राजबहादुर** : उतार वयांत बोहल्यावर चढणाऱ्यांच्या बायका त्यांच्या डोक्यावर अशा चढून बसतात !

**रंगराज** : अन् नवऱ्याचा चढेलपणा उतरवतात हेंच खरं. कांहीं म्हणा, पण राजबहादुर, तुमचं अवसान अखेरीला लटपटलंच !

**राजबहादुर** : अरे, मीं सारं लटकंच अवसान आणलेलं होतं. तशी माझी

बायको चांगली गुणाची आहे. पण अशी कांहीं तोंडाळ आहे कीं पुसूंच नकोस. ब्रह्मदेवानं माझ्या तोंडाला पानं पुसून घाईघाईनं तिच्या तोंडांत जिभेऐवजीं तरवारीचं पातंच कोंबून दिलेलं दिसतं. पण तिच्या तोंडाचीं वाजंत्रीं बंद करायला माझ्याजवळ युक्त्यांची जंत्री कांहीं कमी नाहीं.

**रंगराज** : तुमची युक्ति म्हणजे—

**राजबहादुर** : खुशामत ! खुशामतीनं खुलणार नाहीं, भपक्याला भुलणार नाहीं अशी एक सुद्धां बायको दुनियेंत सांपडायची नाहीं. आत्तांच तुला चमत्कार दाखवितों ! तारिणी, ए मनहारिणी, जरा इकडे ये पाहूं. हे संजीवनी ! हे अमृतसंजीवनी ! हे मदनामृतसंजीवनी ! हे मदनविलासामृतसंजीवनी ! अरेच्या, हें काय ? हांकेला ओ सुद्धां देत नाहीं ? समजलं. रंगराज, तुझ्यासमोर माझ्याजवळ येऊन बोलायला ती विनयशील पतिव्रता लाजत असेल. तूं जरा बाहेर जा. (रंगराज जातो.) आतां करतोंच प्रकट नारसिंह अवतार ! घेतोंच तिचा खरपूस समाचार ! (कठोर स्वरांत) तारिणी, आधीं इकडे ये...

**तारिणी** : (प्रवेशून) ही आलें ! घ्या पाहूं माझा खरपूस समाचार !

**राजबहादुर** : (ओशाळून) तसं नव्हे ग माझे लाडके ! म्हटलं, तुझी तब्बेत ठीक नसेल तर समाचार घ्यायला येणार होतों. तारिणी, तूं एक गुणी हिरकणी आहेस !

**तारिणी** : आज फारच खुषींत आहे स्वारी. कुठल्या तरी जहागिरीचा वारसा मिळाला वाटतं ?

**राजबहादुर** : जहागीर झक् मारते ! लाखाची मत्ता आणि काडीची सत्ता बरोबर आहे. मी आज सत्ताधीश झालों ! क्रांति झाली ! अजब क्रांति झाली ! पदव्यांची लयलूट ! अधिकारांची खैरात ! उजळत्या भाग्याची चांदरात ! आणि हें सारं कां ? तर युवराजांच्या वाढदिवसाचा समारंभ बंद पडला म्हणून !...

**तारिणी** : काय तरी बाई ! ऐकावं तें तें नवलच ! अहो, अशा गोष्टी राजेलोकांच्या वाढदिवसाच्या निमित्तानं होतात. इथं तर साराच उफराटा प्रकार !

**राजबहादुर** : अग, अंदाधुंदीच्या बेबंद नगरींत, अनागोंदी कारभारांत असाच उफराटा न्याय चालायचा. वज्रांगांना वाटेला लावलं. इंद्रजाल प्रधान झाले. हा राजबहादुर त्यांच्या खास दिमतीला. माझ्या दिमतीला चार शिपाई; शिवाय मला तुरुंगावरचा अधिकार...हीं सुवर्ण–पदकं...पगारवाढ ! बायको !

बायको ! आज मी आनंदानं अगदीं बेहोष झालों आहें ! माझा जयजयकार कर! माझं अभिनंदन कर! खुशामतीच्या जोरावर मला आज जिवंतपणीं स्वर्ग दिसला ! बायको, माझीं आतां माणसांत गणना नाहीं!...

**तारिणी** : एवढं बरीक अगदीं खरं बोललांत ! शुद्ध जनावर आहांत तुम्ही ! अष्टौप्रहर जी हुजरचा मंत्र जपून वरिष्ठांना पुजणारे हांजीखोर होयबा तुम्ही...माणसांत का जमा आहे तुमची ?

**राजबहादुर** : नवऱ्याचं भाग्य बघवत नाहीं ती बायको कसली ? माझी प्रचंड कर्तबगारी—

**तारिणी** : आग लावा त्या दुष्ट कर्तबगारीला ! इंद्रजालाचे–त्या सैतानाचे साथीदार तुम्हीं ! पायचाटे, लाळघोटे, तोंडपुजारी...

**राजबहादुर** : अग बायको, ही राजनिष्ठा आहे, राजसेवा आहे ! सत्ताधाऱ्यांच्या लत्ता खाऊन त्यांचा कुत्ता बनणं हेंच राजनिष्ठेचं रहस्य आहे ! अग, हे सरकारी अधिकारी म्हणजे पालखीचे गोंडे ! ह्यांच्यापुढं तोंडापुरता गोंडा घोळला तरच भाग्याचा हंडा मिळतो !

**तारिणी** : अशीच जातें आणि धारिणीदेवींना सांगतें कीं इंद्रजालांच्या ह्या नीच हस्तकांची हजेरी अगोदर घ्या !

**राजबहादुर** : दयावंत राणीसरकार ! शरणागताला अभयदान द्या ! ( साष्टांग नमस्कार घालतो. तारिणी झिडकारून जाते. तोंच दुसऱ्या बाजूनें रंगराज हंसत हंसत येतो. ) गाढवा, परवानगीवांचून आंत कां आलास ? ही काय शिस्त झाली ?

**रंगराज** : मला वाटलं धाडकन् धान्याची कणंग कोसळली !

**राजबहादुर** : अरे, जरा उभ्याचा आडवा झालों इतकंच. तुला काय वाटलं ? मी बायकोपुढं लोटांगण घातलं ? पण तूं कां मध्येंच अडमडलास ? मस्तवाल ! पुन्हा शिस्त मोडतांना पाठीला तेल लावून येत जा—

**रंगराज** : पण हें वड्याचं तेल वांग्यावर कां ? माझ्यावर कां राग ? बाहेर प्रधानजींचं बोलावणं आलंय् हें सांगायला आलों मी...

**राजबहादुर** : काय म्हणतोस ? इंद्रजालांचं बोलावणं ? वरिष्ठांचं बोलावणं म्हणजे देवाघरचंच बोलावणं तें ! चल, चल झटपट.

[ रंगराजासह घाईघाईनें जातो.

## [ ३ ]

वज्रांगाच्या वाड्यापुढील उद्यान. कामिनी पुष्पहार घेऊन लगबगीनें प्रवेश करते. समोरून इंद्रजाल येतो.

**कामिनी** : बाई बाई ! शर्थ झाली ! स्वारीला शोधायचं तरी किती न् कुठं ? आज कृतांतदादानं तुम्हाला प्रधान नेमलं...

**इंद्रजाल** : म्हणून हा हार माझ्या गळयांत घालून माझं अभिनंदन करणार आहेस वाटतं ?

**कामिनी** : होयच मुळीं. किती उत्साहानं मी हा हार गुंफला पण सगळा मेला कोमेजूनच गेला...स्वारीचा पत्ता कुठं आहे ?

**इंद्रजाल** : ( हार घेऊन ) हा फुलांचा हार कोमेजूं दे पण ह्या कोमल बाहूंचा गोंडस हार तर माझ्या कंठांत विराजूं दे ! हीं कळयाफुलं सुकलीं तरी लालबुंद अधरांची ही साखरकळी...

**कामिनी** ! इश्श !

**इंद्रजाल** : प्रेमाची देवता रुसली वाटतं ?

**कामिनी** : हो तर ! प्रेम प्रेम म्हणायचं अन् असा लबाडीचा लपंडाव—

**इंद्रजाल** : प्रेमाच्या रसरंगाला लपंडावाखेरीज खरी लज्जतच येत नाहीं. पण मघांपासून मी इथंच उद्यानांत असतांना ह्या नाचऱ्या नखरेल नजेरला कसा दिसलों नाहीं ?

**कामिनी** : प्रेम आंधळं असतं म्हणतात तें हें असं !

**इंद्रजाल** : बरं आंधळं असेल. डोळस बुद्धीच्या पुरुषालाहि तें वेळप्रसंगीं चांगलंच फशी पाडतं की ! कुशलतेनं प्रेमाचे खेळ खेळावेत स्त्रियांनींच ! पुरुषांना तें जमायचं नाहीं.

**कामिनी** : तें कां बरं ?

**इंद्रजाल** : धिप्पाड हत्तीचीसुद्धां हिंमत कमलनालाच्या नाजुक बंधनांत कुचकामाची ठरत असते. वज्रभेदी वीरश्रीनं रंगलेलं रणमर्दांचं हृदय प्रणयिनीच्या प्रेमपाशांत कमलापेक्षांहि कोमल बनत असतं.

**कामिनी :** तें खरं. पण त्रिखंड पृथ्वी जिंकणाऱ्या रणझुंजाराला रमणीचं हृदयब्रह्मांड कां जिंकतां येणार नाहीं ?

**इंद्रजाल :** तळपत्या तरवारीच्या पात्यापेक्षां विलासिनीच्या चंचल डोळ्यांचं पातं अधिक तीक्ष्ण असतं म्हणून !

**कामिनी :** तुमच्या कर्तबगारीच्या तेजानंच ही दासी दिपून गेली आहे.

**इंद्रजाल :** पण माझी ही कर्तबगारी यशस्वी ठरेपर्यंत अशीच तुझी मदत...

**कामिनी :** म्हणजे ? कृतांतदादाची महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्यासाठीं तुम्ही एवढे प्रयत्नांचे पर्वत उभारतां अन् मी बरी स्वस्थ बसेन ? (लाजून) ह्या उपकारांची फेड दादा करणारच आहे...

**इंद्रजाल :** होय. पण हा हात माझ्या हातीं लग्नविधीनं कायमचा येईपर्यंत असा वेळोवेळीं थोडा हातभार लावायला आला तरी पुरे होईल. महाराजांच्या हितासाठीं हा इंद्रजाल हातावर शिर घेईल पण प्रेमळ प्रोत्साहनाची ही जागती ज्योत हिंमतीचा हात देईल तर जिवाला तेवढाच धीर येईल. (तिचा हात धरतो.)

**कामिनी :** पण बाई, जाऊं दे मला आतां. शिकारीला निघायचं ना ?

**इंद्रजाल :** म्हणून तुझी एव्हांपासूनच तारांबळ उडाली आहे वाटतं ? उगीच ओढून ताणून चंद्रबळ आणतेस झालं.

**कामिनी :** अगबाई ! ते पाहा, संजय आणि वज्रांग इकडेच येताहेत.

**इंद्रजाल :** फारच छान ! त्यांच्याच पाळतीवर मी इथं उभा आहे.

**कामिनी :** खरंच ? मला वाटलं माझ्याचसाठीं...मुत्सद्दी ग बाई मुत्सद्दी !

[ कामिनी हंसत हंसत जाते. तिच्याकडे तिरस्कारानें पाहात हातांतला हार फेंकून देतो व बाजूला एका कुंजाआड दडतो. तोच संजय व वज्रांग येतात.

**वज्रांग :** युवराज, आपल्या जन्मसिद्ध हक्कांचा न्यायाचा लढा लढतांना कृतांताचाच काय पण प्रत्यक्ष परमेश्वराचा कोप झाला तरी त्याची मला तमा नाहीं. माझीं प्रधानगिरीचीं वस्त्रं इंद्रजालाला दिलीं तरी माझ्या ललाटींच्या रेषा पुसून टाकण्याची शक्ति कृतांताच्या जुलमी हातांत खास नाहीं.

**संजय :** पण माझ्यापायीं इतरांच्या नशिबीं असे दुर्दैवाचे दारुण भोग निष्कारण आलेले पाहून माझं मन अत्यंत कष्टी होतं. इंद्रजाल आणि कृतांत...

**वज्रांग :** कृतांत म्हणजे इंद्रजालाच्या हातांतलं खुळं खेळणं, भोळं बाहुलं आहे. पण इंद्रजालाच्या कारस्थाला कृतांताच्या भोळेपणापेक्षां कामिनीदेवीच्या

खुळ्या प्रेमाचीच खरी मदत होत आहे. त्याच्या फसव्या प्रेमाच्या मृगजळानं हुरळलेली ती हरिणी ! तिला वाटतं आपल्या भावाच्या कल्याणासाठींच हा इंद्रजाल आपलं अमोल कर्तृत्व खर्ची घालीत आहे. त्या इंद्रजालाच्या जादूनं केवळ दृष्टीचीच नजरबंदी होते पण ह्या इंद्रजालाच्या जहरी जादूनं सारी सृष्टि जायबंदी होईल कीं काय अशी धास्ती वाटते.

**संजय** : सारं कळतं पण वळत नाहीं, अशी माझ्या मनाची विचित्र दिङ्मूढ अवस्था झालेली आहे. कांहीं सुचत नाहीं. वीट आला ह्या दुबळ्या जिण्याचा !

**वज्रांग** : देवावर्ताच्या सिंहासनाचा हा हक्कदार राजा असा हतबुद्ध झाला तर हवालदिल प्रजेनं कोणाच्या तोंडाकडे पाहायचं ? माणुसकीला मातीमोल करून तिला पशूंच्या पंक्तीला बसविणारी गुलामगिरी क्रूर कृतांतानं प्रजेच्या नशिबीं आणिली आहे—

**संजय** : गुलामगिरी ! पण केवळ कृतींचं पारतंत्र्य म्हणजेच गुलामगिरी नव्हे तर परावलंबी परिस्थितीच्या कैदखान्यांत स्वतंत्र मानसिक प्रवृत्तींचा कोंडमारा करणारी जी दुःस्थिति तीसुद्धां गुलामगिरीच ! अन् हीच गुलाम-गिरी भोगीत ह्या हतभागी संजयाला आज जीवन्मृताचं जिणं जुलुमानं कंठावं लागत आहे. राक्षसी गुलामगिरीच्या रौरवांतील राजा होण्यापेक्षां स्वातंत्र्याच्या साम्राज्यांतला भणंग भिकारी बनणं सहस्रपटीनं श्रेयस्कर !

**वज्रांग** : किती तेजस्वी, उदात्त विचार हे ! दुर्दैवाच्या टाकीच्या घावांनीं बाळबुद्धीलाहि देवकळा येते हेंच खरं ! युवराज—

**संजय** : वज्रांग, तुमच्या पितृतुल्य वात्सल्याची अमृतगंगा आणि प्रेमळ संजीवनीच्या सदानंदी सहवासाची शीतल छाया माझ्या तापल्या जीवाला ईश्वरकृपेनं लाभली...

**वज्रांग** : खरंच, युवराज, संजीवनीला मीं मुद्दाम आपणाकडे धाडली होती, पण ती तर इथं कुठंच दिसत नाहीं.

**संजय** : हा पाहा, मूर्तिमंत अल्लड आनंद इकडेच येत आहे.

[ संजीवनी येते.

**संजीवनी** : बाबा, बाबा, आज किनई मला ब्रह्मानंद झाला आहे. अन् त्या आनंदाच्या भरांतच हा शिकारीचा पोशाख युवराजांच्या अंगावर मीं किती झटपट चढविला म्हणून सांगूं ? बाबा, आज तुम्ही गुलामगिरीचा

फांस तोडून स्वातंत्र्याची कांस जोडलीत म्हणून विश्वदेवता आज तुमचं आनंदानं अभिनंदन करीत आहे ! बाबा, ती पाहा, वेचक ताराफुलांची तेजस्वी विजयवैजयंती घेऊन पूर्व दिशेच्या दारांत उषादेवी उत्साहानं उभी आहे ! खरं कीं नाहीं युवराज ? उद्यानांतले हे हंसरे फुलोरे कसें आनंदानं डोलताहेत ! अगबाई ! पण हें काय ? हा फुलांचा ताजा हार कोणाच्या चांडाळ हातांनीं इथं असा पायदळीं फेंकून दिला ? (हार उचलते) किती गोंडस हांसरीं कळया-फुलं ! पाहा, युवराज, सदान् कदा तुम्ही असे उदास असतां म्हणून हीं कळयाफुलं तुम्हाला हांसताहेत ! खरं ना हो बाबा ? पण हें काय ? मीं हातीं धरतांच हीं फुलं अशीं कोमेजून हिरमुसलीं कां बरं झालीं ?

**संजय** : त्यांचं स्वातंत्र्य तूं हिरावून घेतलंस म्हणून तीं रुसलीं आहेत तुझ्यावर !

**संजीवनी** : खरं ग बाई खरं ! नाहीं तर मातींत पायदळीं पडलीं असतां-नाहि आनंदानं हांसणारीं हीं फुलं मीं हातांत धरतांच अशीं कां बरं कोमेजावींत ? छे ग बाई ! जा...सृष्टिदेवीच्या स्वतंत्र स्वच्छंदी छकुल्यांनों ! ह्या पुष्करिणीच्या पवित्र निर्मळ हृदयावर विहार करीत आपल्या स्वतंत्रतेचं सुगंधी संगीत दशदिशांना उधळून टाका ! (हार पुष्करिणींत टाकते.) युवराज, तुमच्यासाठीं मी ताज्या सुवासिक फुलांचा सुंदर गेंदेबाज हार गुंफून आणतें हं ! पण तोंपर्यंत इथंच थांबा...जाऊं नका हं....ही मी आलेंच...

[ लगबगीनें जाते. तोंच वज्रसार येतो.

**वज्रसार** : शिकारीला निघण्याची सर्व सिद्धता झाली आहे.

**संजय** : ठीक आहे. हो पुढं. आलोंच...[ वज्रसार जातो ]

**वज्रांग** : युवराज, मलाहि आपल्याबरोबर शिकारीला येण्याची परवानगी असावी. आपण एकटयानं कालकंदरीकडे जाणं मला धोक्याचं दिसतं.

**संजय** : तें कां ? कालकंदरीचं घनदाट अरण्य भयंकर आहे म्हणून ?

**वज्रांग** : नव्हे ! पण आपणाला तिकडे शिकारीला धाडणारांचीं अंतःकरणं कालकंदरीहूनहि अधिक भयंकर काळींकुट्ट आहेत म्हणून !

**संजय** : समजलं. पण वज्रांग, मी गाफिल नाहीं. पूर्ण सावध आहे. शिवाय, तुमच्या प्रेमळ आशीर्वादाचं कृपाछत्र माझ्या संरक्षणाला सदैव समर्थ आहे.

[ प्रणाम करून जातो.

**वज्रांग** : पण युवराज...

[ संजयाच्या पाठोपाठ वज्रांग जातो. त्याच्याकडे क्रोधानें पाहात इंद्रजाल पुढें येतो. इतक्यांत दुसऱ्या बाजूनें राजबहादुर व रंगराज येतात.

**राजबहादुर :** रंगराज ह्या छटेल चंदुलालाला आतां हां हां म्हणतां कसा खुलवितों पाहा! दाखवतोंच तुला खुशामतीचा प्रभाव! सांगितल्याप्रमाणं मुजरा ठोकीत मोठ्यांदा ओरडायचं...( पुढें होऊन दोघे ओरडतात ) विजय असो! प्रधानजी इंद्रजाल महाराजांचा अखंड विजय असो!!

**इंद्रजाल :** कोण? राजबहादुर! मूर्खा, किती उशीर केलास यायला? आत्तां उगवलास?

**राजबहादुर :** हुजूर! देवानं मलाहि पांखरांप्रमाणंच पंख दिले असते तर काय बहार झाली असती! भुर्कन् उडून ह्या पायाच्या सेवेला तत्काल हजर नसतों कां झालों? देवानं मला एखादं गोंडस नखरेल पाखरूं केलं असतं तर हुजूरच्या खास करमणुकीला...

**इंद्रजाल :** भले बहाद्दर! माझ्याविषयीं तुझी काय रे कल्पना आहे?

**राजबहादुर :** हुजूर! कल्पना कसली कपाळाची! कल्पनाशक्तीच ठार होते मुळीं आपली अगडबंब कर्तबगारी पाहून. नराचा नारायण कसा होतो त्याचा प्रत्यक्ष पडताळा पटतो.

**इंद्रजाल :** नराचा नारायण! म्हणजे मी नारायणस्वरूप परमेश्वर?

**राजबहादुर :** होय हुजूर! अन् ह्या आदिनारायणाच्या कृपेनंच आम्हीहि नवकोट नारायण होणार! ह्या आशेनंच आज आम्ही असे अडले नारायण होऊन आपले पाय धरीत आहोंत!

**इंद्रजाल :** गाढव आहेस झालं. हंसतोस काय?

**राजबहादुर :** अहाहा! धन्य धन्य झालों मी! हुजूर मला गाढव म्हणाले! हुजूर मला गाढव म्हणाले—

**इंद्रजाल :** पक्का निर्लज्ज आहेस!

**राजबहादुर :** हुजूर, आपल्या तोंडच्या शिव्यासुद्धां ओव्यांप्रमाणं गोड लागतात. हुजूर, पुन्हां मला गाढव म्हणा ना...( पाय धरतो. )

**इंद्रजाल :** तुम्ही खुशामती लोक शहाण्यालाहि वेड लावाल. चल ऊठ

[ लाथ मारतो.

**राजबहादुर** : हुजूर, आणखी चार दोन तरी लाथा झाडा. हुजूरच्या लाथा खाऊन कपाळमोक्ष झाला तर तोच आम्हां गरिबांचा मोक्ष ! हुजूरचे पाय हाच आमचा स्वर्ग ! अरे रंगराज, इकडे आपला स्वर्ग हुजूरच्या पायाजवळ आलेला आहे आणि बेट्या, तिकडे आकाशाकडे अजागळासारखा आ वासून काय पाहातोस ?

**रंगराज** : देवाची प्रार्थना करतोंय् ! देवा, ह्या बड्या लोकांना दोनच पाय कां रे दिलेस ? आणखी दोन पाय दिले असतेस तर...

**राजबहादुर** : खरंच हुजूर, आपणाला चार पाय असते तर मजा झाली असती ! चार हातांचा विष्णु, चार तोंडांचा ब्रह्मदेव, तसाच हा चार पायांचा...

**इंद्रजाल** : कोण नंदीबैल ?

**राजबहादुर** : छे–छे! हुजूर ! नंदीबैल आम्हीं ! आपण साक्षात् भोळे शंकर!

**इंद्रजाल** : खरं आहे. अन् आमच्यासारख्या भोळ्या शंकरांना शहाणपण नसतं म्हणूनच ते तुमच्यासारख्या नालायक नंदीबैलांचा नंगा नाच असा डोळ्यांसमोर चालू देतात. तुमची वेसण जरी वरिष्ठांच्या हातीं असली, तरी तुम्हां नंदीबैलांचीं शिंगं कनिष्ठांच्याच काय पण खुद्द तुमच्या वरिष्ठांच्याहि डोक्यावर चढल्याखेरीज राहात नाहींत.

**राजबहादुर** : हुजूर, हें काय बोलणं झालं ? वरिष्ठ अंमलदार, बडा मनुष्य म्हणजे भोळा शंकर ! पण त्या शंकराच्या डोक्यावर एखादी चढेल गंगामाई चढून बसलेली असायची ! गोरगरिबांना तिथं थारा नाहीं. गरिबांना वारंवार अर्धचंद्रच दिसायचा ! अन् त्या बड्या लोकांनीं बाळगलेला एखादा विषारी सर्पहि जिव्हारीं डसायचा !

**इंद्रजाल** : वा ! फारच शहाणा आहेस कीं !

**राजबहादुर** : कशाचं काय ? चाललंच आहे...पण आतां कां बोलावणं केलं ?

**इंद्रजाल** : कालकंदरीच्या अरण्यांत संजय आणि धनंजय शिकारीला गेले आहेत. आम्ही आणि कामिनीदेवी तिकडेच जाणार आहोंत. तेव्हां महत्त्वाचं काम म्हणजे...तुझा कान कर इकडे...

**राजबहादुर** : हा धरा कान...

**इंद्रजाल** : (कानांत कुजबुजून) समजलं ? गुप्तपणें चुहूंकडे नीट टेहेळणी ठेव. जा लवकर.

**राजबहादुर** : जी हुजूर. ( रंगराजास एकीकडे ) किती नीच इरसाल इसम आहे हा ! ह्याला कांहीं काळीज ?

**रंगराज** : अहो, आपल्यासारखे लोक हाताशीं आहेत म्हणून तर ह्यांना अशी शिकार साधते. ( जातात. )

**संजीवनी** : ( प्रवेशून ) युवराज–युवराज !–इश्श ! तुम्हीं कोण ? इंद्रजाल ! पण युवराज कुठं गेले ? ते थांबले कसे नाहींत थोडा वेळ ?

**इंद्रजाल** : काय करायचे तुला युवराज ? ते गेले शिकारीला निघून. त्यांचं तुझं लग्न लागलंय् थोडंच ? हा हार तूं त्यांच्यासाठीं गुंफून आणलास वाटतं ? पण हा इंद्रजालच ह्या तुझ्या सुंदर हाराचा आतां अधिकारी होणार आहे.

[ तिच्या हातांतला हार हिसकावून घेतो.

**संजीवनी** : इंद्रजाल, प्रधान झालांत म्हणून अत्यानंदानं वेड तर लागलं नाहीं तुम्हांला ?

**इंद्रजाल** : मला आनंदानं वेड लागलं नसून, संजीवनी, तुझ्या डोक्यांत मात्र शोकामुळं वेडाचं वारं संचारलेलं दिसतं. बापाच्या भाग्याचा उजळता तारा कायमचा मावळला...

**संजीवनी** : इंद्रजाल, प्रधानपद नष्ट झालेल्या वज्रांगांची मुलगी म्हणून नव्हे, तर युवराज संजय् महाराजांची...

**इंद्रजाल** : वाग्दत्त वधू म्हणून मला कोणता हुकूम सोडणार आहेस ?

**संजीवनी** : माझा हार मला परत द्या पाहूं. सुशील कुमारिकेची अशी अमर्यादा करणं तुम्हांला शोभत नाहीं. पापी वासनेनं माझ्या हाराची अपेक्षा कराल तर विषारी सर्पाच्या विळख्याप्रमाणं तो तुम्हाला जाळून टाकील...

**इंद्रजाल** : ( मोठ्यानें हंसून. ) हा हार मला जाळणार ? शंकरानं आपल्या तृतीय नेत्रांतील अग्नीनं मदनाला जाळलं म्हणतात. पण हा रुद्रावतार तुझ्या-सारख्या रतीच्या रूपलावण्याची राखुंडी नुसत्या नजरेच्या निखाऱ्यानं क्षणार्धांत करील. हा पाहा, तुझ्या हातून हिसकावून घेतलेला हा हार ! तुझ्या उमलत्या तारुण्याप्रमाणंच ह्याचाहि खुलता तजेला रसरशीत आहे. पण ज्या हातांनीं मला अद्यापि कित्येकांच्या मुंड्या मुरगळायच्या आहेत त्याच ह्या हातांनीं हीं फुलं कुसकरून मी अशीं मातीला मिळवतों पाहा ! ( हार पायाखालीं तुडवितो. ) घवघवीत सुगंध आणि टवटवीत तजेला ! मातीला मिळाला ! तुझ्या शीलाची

कस्तुरीहि अशीच मातीमोल करायला मला कितीसा वेळ लागणार आहे ?

**संजीवनी :** संजीवनीचं शिर कलम होईल पण शील सलामतच राहील !

**इंद्रजाल :** शील ! वैभवाच्या शिखरावरून दैन्याच्या दरींत कोसळलेल्या कंगाल करंट्यांना शीलाचा दिमाख काय कामाचा ? आकाशींची चांदणी खालीं निखळली कीं तिचं तेज नष्ट होऊन ती फत्तरांच्याच पंक्तीला बसायची !

**संजीवनी :** पवित्र शीलाची किंमत कमअस्सल नादानांना कशी कळणार ?

**इंद्रजाल :** पुरे कर शीलाचा टेंभा ! अशा कैक कुमारिका शीलाचा खोटा दिमाख उराशीं कवटाळीत माझी शेज साजरी करीत असतात. हा इंद्रजाल...

**संजीवनी :** हां ! दूर हो चांडाळ !...

**इंद्रजाल :** तुला आपली रखेली म्हणून अशी खेंचून नेणार !

**संजीवनी :** ( मोठ्यानें ओरडून ) बाबा ! बाबा !

**इंद्रजाल :** नरडं दाबून जीव घेईन आरडाओरडा करशील तर !

[ हात धरतो. तोच वज्रांग येतो.

**वज्रांग :** खबरदार ! सोड तिचा हात...

**इंद्रजाल :** ( चपापून मागें सरून ) कोण वज्रांग ?

**वज्रांग :** होय षंढा ! तोच मी !

**इंद्रजाल :** मला षंढ शब्दानं संबोधणाऱ्या जिभेचे तुकडे तुकडे होतील...

**वज्रांग :** पण आधीं अश्राप कुमारिकेच्या अंगावर टाकलेला हात तेथल्या तेथं कलम होईल ! बेशरम जनावरा, तूं षंढ नव्हेस तर कोण ? परस्त्रीपुढं पुरुषत्व प्रगट करणारा पापी पुरुष षंढच समजला पाहिजे ! अरे, परस्त्रीच्या बाबतींत षंढ बनतात तेच खरे पुरुष ! आणि सच्छील कुलवधूंच्या पदराला पापवासनेनं हात घालणारे तुझ्यासारखे बदफैली नरपशू खरेखुरे षंढ ! समजलास ? बदमाश !...

**इंद्रजाल :** बदमाष ? कोण ? हा इंद्रजाल कीं ह्या इंद्रजालावर फिदा असलेली, संकेत करून त्याला इथं एकान्तांत बोलावणारी ही बदफैली पोरटी बदमाष ?

**संजीवनी :** काय ? मीं तुला संकेत करून बोलावलं ? काळसर्पा, तुझे हे पापी शब्दांचे फूत्कार...

**वज्रांग :** ह्या फूत्कारांनीं माझा क्रोधाग्नि मात्र अधिक भडकवला ! चल ये-

तुझ्या बोलण्यांत सत्याचा अंश आणि अंतःकरणांत पावित्र्याचा लवलेश असेल तर हें पावित्र्याचं दिव्य करायला तयार हो ! ( तरवार उपसतो. )

**इंद्रजाल :** अशा बेअकली नादानाच्या समशेरीला सामना द्यायला इंद्र-जालाची शूर समशेर समर्थ आहे.

[ दोघे लढतात. वज्रांग इंद्रजालाच्या छातीवर गुडघा रोवून बसतो. इंद्रजाल किंचाळूं लागतो. तोंच कृतांतराय येतो.

**वज्रांग :** बोल, कोण बदमाष ?

**कृतांत :** वज्रांग !—

**वज्रांग :** ( उठून आदबीनें ) कसूर माफ ! महाराज, स्त्रियांच्या शीलाची जबाबदारी पुरुषांवर असते. जागत्या डोळ्यांदेखत त्यांची विटंबना पाहात स्वस्थ बसण्याइतकी सहनशीलता...

**कृतांत :** इंद्रजाल, हा काय प्रकार आहे ?

**इंद्रजाल :** महाराज, इंद्रजालाची ही समशेर राजद्रोह्यांचंच रक्त पिण्यासाठीं बाहेर पडली होती !

**कृतांत :** म्हणजे ? स्पष्ट सांगा...

**इंद्रजाल :** महाराज, ह्या बापलेकींचे महाराजांच्या प्राणावर बेतणारे बेत चालले होते. ते मुळांतच उखडून टाकण्यासाठीं ह्या इंद्रजालानं आपले प्राण पणाला लावले होते !

**संजीवनी :** चांडाळा ! शर्थ केलीस अधमपणाची ! धडधडीत असत्याच्या नरकांत न्हाणारी तुझी जीभ—

**कृतांत :** संजीवनी, तोंड आंवर ! संभावितपणाच्या पांघरूणाखालीं दुष्ट वृत्ति दडविण्याचे तुमचे पाजी प्रयत्न फोल आहेत ! वज्रांग, तुझे कारस्थानी कावे-कांगावे माझ्या ओळखीचे आहेत ! संजयाची तळी उचलतांना तुम्हीं सर्वांनीं मला पाताळीं गाढायला पाहावं हें रास्तच आहे !

**वज्रांग :** सत्याच्या संग्रामांत उत्साहानं उडी घेणारा कर्मवीर अशा आत-तायीपणाच्या अत्याचारांना कधींच प्रवृत्त होत नसतो. शिवाय, युवराजांच्या सिंहासनाचा राजमार्ग, कृतांता, तुझ्या रक्तानं रंगविण्याचं मला काय कारण ? त्या मार्गांतले विषारी कांटे दुसरेच आहेत !

**कृतांत** : पण माझा मार्ग सुरक्षित करण्यासाठीं तुझ्यासारख्या राजद्रोह्यांचे कांटे मला प्रथम दूर केलेच पाहिजेत !

**वज्रांग** : राजद्रोही मी नव्हें !—तूं—तूं राजद्रोही आहेस ! देवावर्तीचं सिंहासन बळकावूं बघणारा, प्रजेला क्रूर दडपशाहीच्या चरकांत पिळणारा तूं ! तूं राजद्रोही आहेस ! राजाच्या खोट्या नांवावर मिरविणाऱ्या तुझ्यासारख्या धर्मनीतीच्या दरोडेखोराला राजनिष्ठा म्हणजे राजद्रोहच वाटायचा !

**कृतांत** : राजनिष्ठा अं ! कालदुर्गाच्या कैदखान्यांत तुझ्या ह्या राजनिष्ठेला डांबून टाकलं पाहिजे !

**वज्रांग** : पर्वा नाहीं !

**संजीवनी** : मायदेशाचं मंगल चिंतणारा, राष्ट्रप्रेमानं ओथंबणारा कोणता वीरात्मा अशा अघोर बंदिवासाची दिक्कत धरणार ? कैदखाने म्हणजे राष्ट्रभक्तांचे राजमहाल !

**वज्रांग** : आज तूं ह्या वज्रांगाला कैदखान्यांत कोंडीत नाहींस तर न्यायबुद्धीला ठार करून स्वतःचाच कोंडमारा करून घेत आहेस ! तुझ्या वाटेंतला कांटा तूं दूर करतो आहेस. पण कृतांता, लक्षांत ठेव, ईश्वराघरचा न्यायाचा कांटा फार तीक्ष्ण आहे !

**कृतांत** : बस्स. पकडा ह्याला...ह्याची जहागिर जप्त करा...जिवंतपणीं ह्याला यमयातना भोगूं दे !

**वज्रांग** : तुम्हांला सुचतील ते क्रूर अत्याचार एकदम अंमलांत आणा. वज्रांगाचं वीरहृदय धरणीकंपाच्या धक्क्यानंहि हादरणार नाहीं.

**संजीवनी** : आपत्तींच्या आगींतच वीरांचं आत्मतेज प्रकट होत असतं !

**कृतांत** : घेऊन चला ह्याला. तशीच ह्या बंदिवान् बंडखोराची ही कारटी—

**संजीवनी** : बंदिवान् ? माझे पितृदेव बंदिवान् ?—माझे बाबा बंदिवान् नाहींत ! राष्ट्रभक्ताला बंदिवान् करतांना लोखंडाची बेडीसुद्धां फुलांचं कोमल रूप धारण करीत असते !

**कृतांत** : कळेल—कळेल ! तुझ्या बापाचा हा धिप्पाड देह कणखर साखळदंडांनीं जखडून गेल्यावर—

**संजीवनी** : चार भिंतींनीं वेढलेल्या दगडी कोटकिल्ल्यांत साखळदंडांनीं देह जखडून गेला तरी, राष्ट्रभक्तांच्या स्वतंत्र तेजस्वी वृत्तींना डांबून टाकणारा

एकसुद्धां तुरुंग अद्यापि पृथ्वीच्या पाठीवर निर्माण झालेला नाहीं! कृतांता, कर्मवीर महात्मा आपल्या वीरवृत्तीच्या तेजस्वितेनं तुझ्यासारख्या जुलमी राज्यकर्त्यांचे राजदंडच काय, पण प्रत्यक्ष यमदंडसुद्धां छिन्नविछिन्न करून टाकीत असतो!

**वज्रांग** : बाळे, हे बृहस्पतीचे बोल ह्याला कशाला ऐकवितेस? नीच वृत्तींच्या विषारी वेलीला स्वर्गसुधेच्या सिंचनानं तरी अमृताचीं गोड फळं कशीं येणार? बाळे... ( गहिंवरतो )

**संजीवनी** : बाबा—बाबा, कोणत्या जन्मींचं पाप ह्या सैतानांच्या स्वरूपांत आज आपल्यापुढं उभं राहिलं हो!

**वज्रांग** : बाळे, हें काय खुळयासारखं? तुझ्या डोळयांत आसवं उभीं राहिलीं? कालदुर्गाच्या कैदखान्यांत जाण्यासाठीं—तुरुंगाची तीर्थयात्रा पार पाडण्यासाटीं ह्या वज्रांगाला आनंदानं निरोप दे. हा कैदखाना म्हणजे माझ्या राष्ट्रभक्तीला, तुझ्या अभंग शीलशक्तीला, शुक्राच्या तेजाकडे, ध्रुवाच्या अढळ-पदाकडे पोंहोंचविणारा स्वर्गसोपान आहे! संजीवनी, हे दुःखाचे अभद्र अश्रू आंवरून घे अन् मला प्रसन्न मुद्रेनं निरोप दे. माझं चारित्र्य आणि तुझं पावित्र्य, बाळे, आज अशा विचित्र प्रसंगाच्या निकषावर उजळून निघणार आहे! धीर धर—

**संजीवनी** : ( हंबरडा फोडून ) धीर धरूं? बाबा! कसा हो धीर धरूं? ( कमरेला मिठी मारते ) बाबा, माझ्या पाठीवरून फिरणारा आईचा प्रेमळ हात त्या कृतांत काळानं माझ्या लहानपणींच दूर ओढून नेला! आणि आज माझं पित्याचं प्रेमळ छत्रसुद्धां हा कृतांत असा हिरावून घेत आहे! बाबा, ह्या उघड्या जगाच्या वैराण वाळवंटांत ही तुमची लाडकी संजीवनी कुठं हो वणवण करीत फिरेल? आईबापावेगळी ही तुमची पोरकी पोर अशी कुणाच्या गळां पडून ह्यापुढं आपल्या जिवाचं दुःख हलकं करील?

**वज्रांग** : संजीवनी, तूं ह्या वज्रांगाची कन्या आहेस हें विसरूं नकोस. रडूं नकोस. अश्रू मागं घे...( तिचे डोळे पुसतो. )

**संजीवनी** : ( हुंदका आवरून ) अश्रू मागं घेऊं? हे पाहा, मीं डोळे पुसले. वीरकन्येच्या वीरवृत्तीनंच हे शोकाचे जाळते कढ आंवरते घेतें आणि तुम्हांला आनंदानं निरोप देतें. जा, राजनिष्ठेचं रहस्य जगाला पटविण्यासाठीं आनंदानं तुरुंगाची वाट धरा...

**वज्रांग :** अहाहा ! आतां ह्या राजनिष्ठ वज्रांगाची कन्या तूं शोभतेस खरी !

**संजीवनी :** कृतांता ! पाहा, तुझ्या दुष्ट महत्त्वाकांक्षेच्या खखखलेल्या खाईंत आपल्या पितृदेवाचा पहिला बळी ही संजीवनी आज आनंदानं देत आहे ! पण लक्षांत ठेव, विवेकशून्य मदांधा, भयंकर अधःपात हीच तुझी भवितव्यता !

**वज्रांग :** कृतांता ! कुमारिकेच्या पिळवटलेल्या अंतःकरणांतली परमेश्वरी शक्ति तुला हा जाळता शाप देत आहे !

**कृतांत :** बेवकूफ ! ह्या कृतांताला रोखणारी एक तरी शक्ति ह्या जगांत अस्तित्वांत आहे काय ?

[ धारिणी प्रवेश करते.

**धारिणी :** आहे–आहे ! महाराज–महाराज ! काय अनर्थ मांडलांत हा ! वज्रांगांना उदार मनानं क्षमा करा—

**कृतांत :** माझ्या प्राणावर उदार होणाऱ्या हरामखोराला उदार मनानं क्षमा ? सिंहासनाच्या शत्रूला क्षमा ?

**धारिणी :** सिंहासन ? कोणाचं सिंहासन आणि कोण कोणाचे शत्रू ? सिंहासनाच्या शत्रूंना मित्र समजून डोक्यावर चढवितां; आणि वज्रांगासारख्या सज्जनांना पायाखालीं तुडवितां ! वज्रांगांना बंधमुक्त करा—

**कृतांत :** इंद्रजाल, हुकुमाची अंमलबजावणी ताबडतोब झाली पाहिजे.

[ धारिणीकडे रागानें पाहात निघून जातो.

**वज्रांग :** आईसाहेब, माझ्या मुक्ततेची काळजी करूं नका. माझी पोरकी पोर मी तुमच्या ओटींत घालतों...आईसाहेब, तिच्या संरक्षणाचं मला आश्वासन द्या...मग हा संसाराच्या पाशांतून सर्वथैव मुक्त झालेला जीव राष्ट्रसेवेपायीं प्राणान्तापर्यंत कैदखान्यांत खितपत पडला तरी चिंता नाहीं !

**इंद्रजाल :** घेऊन चला ह्याला...

[ शिपाई वज्रांगाला घेऊन जाऊं लागतात.

**वज्रांग :** आईसाहेब, संजीवनीला धीर द्या—बाळे...जातों...

**संजीवनी :** बाबा–बाबा !...

[ मूर्च्छित पडते. धारिणी तिला सांवरते.

# २

कालकंदरीचें अरण्य. कामिनीदेवी घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करते.

**कामिनी** : छे बाई ! पावलोपावलीं मन थबकतं, हृदय दबकतं. किती भयंकर अरण्य हें ! सूर्याचीं प्रखर किरणं देखील इथं प्रवेश करायला बिचकताहेत !

[ हिंस्र पशूंच्या गर्जना व हांके लोकांच्या आरोळ्या ऐकूं येतात. वज्रसार येतो.

**कामिनी** : ( घाबरून ) वज्रसार, हा प्रचंड कोलाहल कसला ?

**वज्रसार** : शिकारीसाठीं हांक्यांनीं तिकडे रान उठवलं आहे. भीतीनं भांबावलेलीं जंगली जनावरं गर्जना करीत सैरावैरां धांवत सुटलीं आहेत...

**कामिनी** : खरंच ? मग ताबडतोब संजयाला त्या बाजूला घेऊन जा... त्याची शिकार झाली पाहिजे. समजलं ?

**वज्रसार** : जशी आज्ञा ! ( जातो. )

**कामिनी** : पण हे इंद्रजाल कुठं गेले ?

[ इंद्रजाल येतो.

**इंद्रजाल** : बंदा हजर आहे सेवेला! पण वज्रसार कुठं आहे? सावजं उठविलीं आहेत...

**कामिनी** : म्हणून तर आपलं सावज तिकडे घेऊन जायला मी आत्तांच त्याला फर्मावलं आहे...

**इंद्रजाल** : फारच छान! आज दुप्पट शिकार साधणारसा रंग दिसतोय्. एका दगडांत दोन पक्षी!

**कामिनी** : म्हणजे?

**इंद्रजाल** : तो हद्दपार केलेला थेरडा शक्तिसिंह ह्याच कालकंदरीच्या आसपास कुठं दऱ्याखोऱ्यांत दडी देऊन बसला आहे म्हणे! आत्तांच हेरांनीं बातमी आणली—

**कामिनी** : अस्सं!

**इंद्रजाल** : साऱ्या प्रजेला फितूर करून साम्राज्याविरुद्ध बंड पुकारण्याचा त्यानं चंग बांधला आहे—

**कामिनी** : मग त्याला सावधगिरीनंच शह दिला पाहिजे.

**इंद्रजाल** : हो, पण आधीं संधि साधून संजयाचा शेवट इथंच केला पाहिजे! तरच त्याचं बंड कायमचं थंड पडेल.

**कामिनी** : पण हा बेत बिनबोभाट पार पडायला हवा.

**इंद्रजाल** : ती काळजी नको. शिकारींत संजय वाघाच्या भक्ष्यस्थानीं पडला अशी अफवा लोकांत उठवली म्हणजे झालं! चल, तांतडीनं कार्यभाग उरकला पाहिजे—

**कामिनी** : मुत्सद्दी ग बाई मुत्सद्दी!

[ दोघें जातात. संजय व वज्रसार येतात.

**वज्रसार** : सरकार, चला, चला, चटचट पाय उचला. शिकारीचा खरा मजा आत्तांच आहे. जनावरं मोकाट सुटलीं आहेत. मोकळं जनावर टिपून मारण्यांतच खरी मौज.

**संजय** : पण त्या निष्पाप मुक्या जनावरांना केवळ षोकाखातर ठार करायला माझं मनच घेत नाहीं.

**वज्रसार** : म्हणजे ? शिकारींत आपलं मन रमत नाहीं ?

**संजय** : मुळींच नाहीं.

**वज्रसार** : आश्चर्य आहे ! शिकारीचा षोक असणं हें तर राजेपणाचं मुख्य लक्षण !

**संजय** : शूरांच्या शौर्याला कलंक आहे तो !

[ राजबहादुर धांवत धांपा टाकीत येतो.

**राजबहादुर** : सरकार, सरकार,—

**वज्रसार** : असं जीव गेल्यासारखे ओरडतां काय ?

**राजबहादुर** : जीव गेल्यावर ओरडेन कसा ? माझा जीव गेला नाहीं तर आत्तां कुठं माझ्या जिवांत जीव आला आहे.

**संजय** : वाघसिंहांच्या गर्जना ऐकून घाबरलास वाटतं ?

**राजबहादुर** : मी घाबरणार ? घाबरून जीव सोडायला माझ्या अंगांत काय जीव नाहीं ? हा राजबहादुर शूर आहे ही गोष्ट महशूर आहे.

[ रंगराज येतो.

**रंगराज** : ( वज्रसारास ) सरकारनां घेऊन कामिनीदेवींनीं तिकडे ताबडतोब बोलविलं आहे.

**वज्रसार** : चला सरकार...

**संजय** : मी येणार नाहीं !

**वज्रसार** : पण सरकार...

**संजय** : एकदां सांगितलं ना, येणार नाहीं म्हणून ? तिकडे नेऊन माझीच शिकार करण्याचा घाट घातला आहे वाटतं तुम्हीं लोकांनीं ?

**वज्रसार** : ( चमकून ) छे-छे ! सरकार, भलतंच काय बोलतां हें ?

**संजय** : मग निघून जा येथून...

**वज्रसार** : मर्जी आपली ! ( जातो. )

**संजय** : तुम्हीं कां थांबलांत ? तुम्हीसुद्धां चालायला लागा—

**राजबहादुर** : स्वारीच्या सोबतीला बसतों आम्ही इथं—

[ एका शिलाखंडावर राजबहादुर व रंगराज बसूं लागतात.

**संजय** : उठा तेथून. तुमच्यासारख्या शेंदाडशिपायांची सोबत मला नको !

**रंगराज** : पण जनावरं जंगलांत चहूंकडे उधळलेलीं...

**संजय** : तुम्हां नरपशूंपेक्षां त्या हिंस्र पशूंचा सहवास मला अधिक संतोषाचा वाटेल. अष्टौप्रहर माझ्यावर पाहारा ठेवण्याचा हुकूम आहे वाटतं तुम्हाला ?

**राजबहादुर** : जशी सरकारांची मर्जी ! चल बाबा रंगराजा !

[ राजबहादुर व रंगराज जातात. दुसऱ्या बाजूनें रक्तानें रंगलेल्या पोशाखाचा धनंजय एका वाघाच्या पिल्लाला ओढीत आणतो.

**धनंजय** : युवराज, युवराज, ही पाहा, मीं केवढी भली जंगी शिकार केली आहे. खूप दांडगा वाघ ठार केला मीं. हा चवताळून इंद्रजालांच्या अंगावर चालून गेला होता आणि युवराज—

**संजय** : पण कुमार, आजच तूं ह्या संजयाला—तुझ्या दादाला युवराज कां म्हणतोस ? बोल, बोल, ह्या पोरक्या संजयाला आजच कुणी युवराज बनविलं ?

**धनंजय** : आईनंच मला बजावलं कीं, तुम्हांला नेहमीं युवराज म्हणायचं !

**संजय** : काय ? धारिणीदेवीनं ?

**धनंजय** : होय. पण दादा, छट्—युवराज, तुम्हीं गप्प कां ? बोला ना ?

**संजय** : बोलूं ? काय बोलूं ? कुमार, ह्या प्रसंगीं तुझ्या निर्व्याज प्रेमानं आणि तुझ्या आईच्या औदार्यानं ह्या संजयाला—तुझ्या दादाला मुकं बनविलं आहे रे ! मी युवराज ? (गहिवरून) कुमार—कुमार, मी युवराज नाहीं—मी युवराज नाहीं. कृतांतरायांच्या, तुझ्या पूज्य पित्याच्या पदरचा मी एक अनाथ आश्रित मात्र आहें. कुमार, हा संजय युवराज नव्हे; तर हा भाग्यशाली धनंजय युवराज !

**धनंजय** : कोण मी ? हें राज्य तुमच्या मालकीचं असतांना मी युवराज ?

**संजय** : होय. तूं युवराज ! लौकरच युवराजपदावर अधिष्ठित होणारा हा सम्राट् कृतांतरायांचा लाडका धनंजय युवराज ! ( धनंजयाला जवळ घेतो )

**धनंजय** : भलतंच काय बोलतां हें ! दादा, दादा—युवराज...

**संजय** : कुमार, मला युवराज म्हणूं नकोस. दादा अशीच प्रेमळ हांक मार. हा संजय देवावर्ताचा युवराज असला तरी तुझा प्रेमळ दादाच आहे !

**धनंजय** : दादा, हें राज्य तुमचं आहे. पण तेंच माझ्यासाठीं बाबा बळकावूं बघताहेत. आईनं सारं मला समजावून सांगितलंय्—

**संजय :** कुमार, विवेकशील विचारांचा विकास वयाच्या वाढीवर अवलंबून नसतो हें आज तूं माझ्या अनुभवाला आणलंस. तुझ्या सत्वशील सौजन्याचा आणि दैवी गुणांचा गौरव करण्यासाठीं ह्या देवावर्ताचाच काय पण अलम् दुनियेचा साम्राज्यमुकुट तुझ्या मस्तकावर चढवतांना ह्या संजयाला पराकाष्ठेचा आनंदच होईल !

[ पडद्यांत—' न्यायधर्माच्या संरक्षणासाठीं एकसुद्धां वीरात्मा ह्या देवावर्तात जिवंत राहिला नाहीं काय ?'

**संजय :** हा कुणाचा पोरका सवाल ?

[ पडद्यांत—' अनाथ प्रजेचा प्रेमळ वाली कोणीतरी आहे काय ?'

**संजय :** आहे-आहे ! देवावर्ताचा भावी सम्राट्—हा युवराज संजय—

**धनंजय :** युवराज, कुणाशीं बोलताहांत ?

**संजय :** आत्तांचा सवाल तूं ऐकला नाहींस ? आकाशवाणी तर झाली नाहीं ना ? ( पडद्यांत-पूर्वोक्त. ) देवावर्ताची अनाथ साम्राज्यलक्ष्मी...

[ संजीवनी येते.

**संजीवनी :** होय. ह्या संजीवनीच्या स्वरूपांत ती साम्राज्यलक्ष्मीच आपल्याला हा रोकडा सवाल करीत आहे ! बोला, युवराज, बोला...

**संजय :** कोण ? संजीवनी !

**संजीवनी :** होय-मी संजीवनीच ! पाहा युवराज, ह्या संजीवनीचा हा अवतार उघड्या डोळ्यांनीं पाहा. आणि बोला, दिवसाढवळ्या धर्मनीतीची कत्तल होत असतां आपलं राजतेज दडपून ठेवून तुम्ही स्वस्थ बसणार काय ? दुःख, दैन्य आणि दारिद्र्य ह्या तापत्रयानं तुमची प्रजा तिकडे डोळ्यांत पंचप्राण आणून तळमळत आहे आणि इकडे तुम्हांला हे असे शिकारीचे राजविलासी रंगढंग सुचतात काय ? सांगा युवराज, सांगा. परमेश्वरानं तुम्हांला जन्मानं राजे केलं पण आपलं राजाचं कर्तव्य बजावून कर्मानं खरेखुरे राजे तुम्ही केव्हां होणार ? राजाचं नांव सांगायचं आणि अंगांत नांवापुरतासुद्धां राजेपणा नसायचा ! धिक्कार-धिक्कार असो अशा नेभळ्या—नादान युवराजाला !

**संजय :** शांत हो ! संजीवनी, शांत हो !

**संजीवनी :** शांत होऊं ? कां शांत होऊं ? कशी शांत होऊं ? देवांनीं देवपण टाकलं ! दैत्यापुढं दैवी तेज वांकलं ! राजानं राजेपणा सोडला—

प्रजेनं प्राणान्त मांडला ! संजय महाराज, कर्मानं राजे व्हा, राजधर्मानं राजे व्हा ! केवळ जन्मानं नामधारी राजे राहूं नका ! धर्मनीतीच्या उद्धारासाठीं, प्रजेच्या संरक्षणासाठीं कर्मानं राजे व्हा ! राजे व्हा ! ! राजे व्हा ! ! !—युवराज, युवराज, मला क्षमा करा...शोकसंतापानं माझ्या हृदयाची होळी पेटली आहे हो ! पण काय करूं ? कुणाची कांस धरूं ? राजाचं राजतेज मावळलं कीं प्रजेच्या नशिबीं अशी आपत्तींची काळरात्रच उजाडत असते ! आईनं लेकराला लाथाडलं, राजानं प्रजेला सोडलं—कुणाला सांगायचं ?

**संजय :** संजीवनी, हा आक्रोश बंद कर. आज तूंच ह्या संजयाला त्याच्या आत्मतेजाची ओळख पूर्णपणें पटवून दिलीस !

**संजीवनी :** युवराज, तुम्हीच ह्या देवावर्ताचे भावी राजराजेश्वर आहांत !

**संजय :** नाहीं–नाहीं–मी ह्या देवावर्ताचा राजा नाहीं, तर देवावर्तांतील प्रत्येक प्रजाजनाचा दुबळा दास मात्र आहे ! राजा–राजा ! केवळ राजकुळांत जन्मलों म्हणून मी राजा ? ह्या कर्तव्यशून्य नादानानं स्वतांला राजा म्हणवून कां घ्यावं ? माझ्यासारख्या नामधारी राजांना विवेकशून्य पशूचं जिणं कंठीत जिवंत राहायचाहि अधिकार नाहीं. राजा ही संस्थाच जगांतून अजिबात नष्ट झाल्याखेरीज प्रत्येकजण राजाप्रमाणं स्वतंत्र आणि सुखी होणार नाहीं !

**संजीवनी :** अहाहा ! हें खरं राजतेज ! अशीं सद्धर्मी सम्राट्रत्नं ज्या सिंहासनाच्या प्रभावळींत चमकतात तींच खरीं सम्राट्‌सिंहासनं ! दिव्य प्रजा-वात्सल्याच्या तेजानं तळपणारं हृदय तेंच खरं राजहृदय ! खरं राजतेज वाढत्या वैभवाच्या राजविलासांत नसून स्वर्गीय राजगुणांच्या तेजोराशींत असतं ! राजाचा राजेपणा राजवैभवांत नव्हे तर राजगुणांत असतो ! राष्ट्राचा उद्धारहि राजनिष्ठ प्रजेच्या, त्याचप्रमाणं प्रजानिष्ठ राजांच्या कर्तव्यपालनांतच असतो !

**संजय :** संजीवनी, मेलेलं अंतःकरण जिवंत करणारी तूंच माझी शौर्य-संजीवनी आहेस ! कर्तव्यासाठीं खडबडून जागं झालेलं हें ह्या संजयाचं सुप्त राजतेज, गुरुदेवते, तुझ्या पायीं लीन झालं आहे !

[ संजय संजीवनीचे पाय धरूं लागतो. ती त्याला दोन्हीं हातांनीं वर उठविते.

**संजीवनी :** हें काय बरं युवराज ? तुमच्या न्यायी राजदंडाचा आधार असल्यावर ही संजीवनी कळिकाळालाहि भिणार नाहीं !

**संजय :** आणि आतां ह्या संजयाचं जागरूक मन आपल्या आंखलेल्या

ध्येयापासून प्राणान्तींहि दूर सरणार नाहीं! पण संजीवनी, तूं इकडे कोणीकडे ? आणि अशी वेडीपिशी कां ? सांग, सांग, काय झालं ?

**संजीवनी** : युवराज, सांगायला गेलें तर ब्रह्मांड आहे! (एकदम हुंदका देते) माझ्या शिरावर ब्रह्मांड कोसळलं आहे हो !

**संजय** : म्हणजे ? वज्रांग कुठं आहेत ?

**संजीवनी** : कालदुर्गाच्या कैदखान्यांत !

**धनंजय** : काय ? बाबांनीं वज्रांगांना कैद केलं ?

**संजीवनी** : माझ्यावरहि तोच प्रसंग ओढवला असता, पण केवळ धारिणीदेवींच्या मायापांखरीमुळं...

**संजय** : काळ्या कारस्थानांचीं किती गूढ कोडीं उकलत चाललीं! चिंता नाहीं. अखिल चराचरांत संचारणारी परमेश्वरी शक्ति साक्ष आहे कीं, उद्यांचा सूर्य उगवण्यापूर्वीं हा संजय वज्रांगांची मुक्तता करील! किंवा प्राणत्याग करून स्वतां स्वर्गाची वाट धरील!—हीच ह्या संजयाची सत्यप्रतिज्ञा! (समशेर उपसून) कर्तव्यासाठीं सज्ज झालेली ही माझी रणमर्दिनी देवावर्ताच्या पंचप्राणांवर लटकलेला जुलुमशाहीचा विखारी फांस तोडल्याखेरीज आतां स्वस्थ बसणार नाहीं !

**संजीवनी** : ईश्वर करो, आणि आपली ही शुभघडीची प्रतिज्ञा पार पडो !

**संजय** : ह्या क्षणापासून पूर्वीचा दुबळा संजय मेला अन् नवा संजय जन्माला आला. दैवाची दिशाभूल संपून अंतःकरणाचा नेत्र उघडला आहे. माझं कर्मक्षेत्र मला स्पष्टपणें दिसूं लागलं. माझ्या प्रतिज्ञेचा भंग करण्याचं सामर्थ्य-

[ इंद्रजाल वज्रसारासह येतो.

**इंद्रजाल** : ह्या इंद्रजालाच्या हातांत आहे. वज्रसार, धाकटया सरकारांना घेऊन नगराकडे निघून जा—

**धनंजय** : आणि युवराज ?

**इंद्रजाल** : युवराज आतां राजधानीला कायमचे मुकले आहेत !

**धनंजय** : शक्य नाहीं. युवराजांना सोडून मी येणार नाहीं. युवराज, चला-

**संजय** : कुमार, तूं जा. राजधानीला माझा शेवटचा नमस्कार सांग! तूंहि मला अखेरचाच निरोप दे. ह्यापुढं हा संजय राजधानींत प्रवेश करील

तो कृतांताच्या तुकड्यावर वाढणारा एक ओशाळा आश्रित म्हणून नव्हे, तर देवावर्ताचा हक्कदार राजा म्हणूनच प्रवेश करील. इंद्रजाल, उत्तम झालं की माझी इच्छा तुम्हींच बोलून दाखवलींत !

**इंद्रजाल** : वज्रसार, कुमारांना घेऊन जा.

**संजय** : कुमार, जा तुम्हीं. माझं ऐकणार ना ? हा हट्ट काय कामाचा ?

**धनंजय** : पण युवराज, तुम्ही नगराकडे येणार ना ? लवकर या हं.

[ वज्रसारासह नाइलाजानें जातो.

**संजय** : ( इंद्रजालास ) तुम्हीसुद्धां आलांत तसे चालते व्हा. तुमच्या इच्छेप्रमाणं मी इथंच राहाणार आहें. तुमच्यासारख्या मानवी सैतानांचा इथं वाराहि वाहात नसल्यानं ही भयाण कालकंदरीच मला राजमंदिरापेक्षांहि रमणीय वाटते ! लक्ष्यांत ठेवा, हा संजय ह्यापुढं कुणाच्याहि इच्छेचा बांधला गुलाम नाहीं. त्याचा तो स्वतंत्र आहे !

**इंद्रजाल** : पिंजऱ्यांतल्या पाळीव पांखरांचे पंख मालकाच्या इच्छेच्या तरवारीनंच तोडून टाकलेले असतात ! त्यांच्या स्वतंत्रतेच्या गुलगुल गर्जना म्हणंजे केवळ करमणूक असते ! जित्या जिवाचा पण मेलेल्या मनाचा एक मुका नजरकैदी तूं ! तुला राजवाड्यांत कोंडला काय किंवा इथंच गाडला काय सारखंच !

**संजय** : राजवाड्यांतला नजरकैदी संजय मेला असून वनवासांतला हा स्वतंत्र युवराज संजय जन्माला आला आहे !

**इंद्रजाल** : पण ह्याला जन्मतःच जमीनदोस्त करायला कितीसा उशीर ?

**संजय** : पण त्यापूर्वींच तुझं कपटी इंद्रजाल तोडून टाकतों पाहा !

**इंद्रजाल** : अरे हरामखोर-चोर...

[ संजय इंद्रजालाचे अंगावर धांवून जातो. संजीवनी अडविते.

**संजीवनी** : चोर ? कोण ? युवराज ? नीच माणसा, देवावर्ताला धर्मशाळा समजून तुझ्यासारख्या नीच दरोडेखोरांनीं धुमाकूळ घातला, देवावर्ताच्या सिंहासनावर वहिवाटीचा आसुरी अंमल गाजविला आणि त्याच सिंहासनाचा हा मालक आज असा चोर ठरला काय ? खासा न्याय !

**संजय** : पण ह्या उफराट्या न्यायाचा आज शेवट होणार !

**इंद्रजाल** : एकूण हें मवाळ मेंढरूं सिंहाचं कातडं पांघरून बंडखोर होणार !

**संजय** : अलबत्. कृतांतासारखे बंडखोर दैत्य जर खोटे राजे बनतात तर माझ्यासारख्या खऱ्या राजांनीं आपल्या जन्मसिद्ध हक्कांसाठीं बंडखोरच बनलं पाहिजे.

**इंद्रजाल** : वा: रे वल्गना !

**संजीवनी** : युवराजांच्या कर्तबगारीला दैवी पाठबळ देण्याला धारिणी-देवींची पुण्याई...

[ मोठ्यानें हंसत कामिनी प्रवेश करते.

**कामिनी** : तुमच्या त्या देवीची पुण्याई अंधारकोठडींत खितपत पडली आहे !

**संजीवनी** : ( आश्चर्यानें ) काय ?

**कामिनी** : आतां तिची मुक्तता करण्यासाठीं तुझीच कांहीं पुण्याई खर्च कर !

**संजीवनी** : धारिणीदेवींची मुक्तता झाल्याखेरीज ही संजीवनी पाणीसुद्धां पिणार नाहीं ! चला युवराज–

**इंद्रजाल** : चाललांत कुठं ? अगोदर ह्या तलवारीचं पाणी चाखावं लागेल. शिपायांनों, ह्या डाकिणीला नि ह्या राजद्रोही बंडखोराला करा गिरफदार...

[ शिपायी तरवारी रोखून सरसावतात. इतक्यांत कांहीं सशस्त्र लोकांसह शक्तिसिंह अकस्मात् येतो.

**शक्तिसिंह** : खबरदार !

**कामिनी** : कोण ? शक्तिसिंह ? बंडखोरांचा साथीदार सैतान !

**शक्तिसिंह** : तुम्हांसारख्या जुलुमी राज्यकर्त्यांचा कट्टा दुष्मान् !

**संजीवनी** : राजनिष्ठेचा प्रत्यक्ष प्राण !

## [ २ ]

कालदुर्गाच्या कैदखान्याची बाहेरील बाजू. तिन्हीसांजची वेळ. राजबहादुर व रंगराज प्रवेश करतात.

**राजबहादुर** : ( वैतागानें ) सरकारी नोकरी म्हणजे सुळावरची पोळी ! त्यांतून ही तुरुंगावरच्या अधिकाऱ्यांची नोकरी म्हणजे...हाय रे परमेश्वरा !

ह्या नोकरीच्या बेडीपेक्षां ती तुरुंगांतली लोखंडी बेडी हजार हिश्श्यांनीं बरी !

**रंगराज :** त्यांतून ह्या वज्रांगासारखा राजकैदी ! हा गडी तुरुंगांत पण खरा तुरुंगवास घडतो आहे आम्हाला ! वरिष्ठांच्या सक्त हुकूमाप्रमाणं सक्तमजुरी देऊन भयंकर हालअपेष्टा चालवल्या तरी हा बहादुर दगडापेक्षां स्थिर आणि मुडद्यापेक्षांहि गंभीर !

**राजबहादुर :** आमचा मात्र इकडे मुडदा पडलाय्. रात्रीचा दिवस करून जागता पाहारा ठेवतों आणि दिवसाची रात्र करून झोंपा ताणतों तरी स्वप्नांत सुद्धां गाढ झोंप मिळत नाहीं. (अंगाला आळोखे पिळोखे देवून) अयाई ! रंगराज हे हातापायांचे सांधे कसे निखळून पडतातसे वाटतं.

**रंगराज :** हातापायांचे सांधे निखळूंदेत हो! डोक्याचे सांधे शाबूत आहेत ना?

**राजबहादुर :** ह्या वज्रांगाचा सोक्षमोक्ष लागेपर्यंत मोठा ताप आहे खरा !

**रंगराज :** तरी बरं ! मुदतीचाच ताप आहे हा !

**राजबहादुर :** त्यांतून, रंगराज, रात्र पडूं लागली कीं माझा रोग जोरानं उसळ्या मारूं लागतो बघ—

**रंगराज :** असा कोणता रोग जडलाय् तुम्हाला ?

**राजबहादुर :** फार जुनाट-असाध्य रोग ! ह्या हट्टी रोगावर औषध देणारा धन्वंतरी आजवर जगांत जन्माला आला नाहीं, अन् पुढंहि जगाच्या अंतापर्यंत खास येणार नाहीं. आणि असा एकहि प्राणी नाहीं कीं ज्याला हा रोग नाहीं !

**रंगराज :** काय म्हणतां ? हा असा कोणता बुवा विचित्र रोग कीं ज्याच्यापुढं अश्विनीकुमारांनीहि हात टेंकावेत ?

**राजबहादुर :** अरे वेड्या, प्रेमाचा रोग ! ह्या रोगावर रामबाण एकच ! काळरसाचा कडू काढा ! म्हणजे मरण !

**रंगराज :** (मोठ्यांदा हंसून) खूप केलीत राजबहादुर ! अहो, हें प्रेमाचं वेड जवानींत शोभतं. म्हातारपणीं मात्र त्याची शोभा होते !

**राजबहादुर :** अरे अरसिका, प्रेम तिन्ही त्रिकाळ जवानच्चं असतं. इष्काचे खेळ खेळायला काळवेळ कसला नि ताळमेळ तरी कसला ! रंगराज, घरीं बायको तरणीताठी आणि आम्हीं असं रात्रंदिवस बाहेर भटकायचं नोकरीपाठीं ! मग बोल, कुणाशीं करायच्या प्रेमाच्या कानगोष्टी ? रंगराज, इकडे जरा जवळ ये रे ! (रंगराजाला एकदम मिठी मारून) मला माझ्या बायकोची आठवण झाली आहे रे !

**रंगराज** : अहो, हें काय वेड्यासारखं ?

**राजबहादुर** : माझी ही शोचनीय अवस्था पाहून तुला कांहींच का रे दया येत नाहीं ? हा जिवंत बायकोचा विधुर—हा लग्न झालेला ब्रह्मचारी...

**रंगराज** : ( एकदम झिडकारून दूर होत ) टाळकं फिरलंय् तुमचं ! अहो मलाच तुम्ही आपली बायको समजलांत कीं काय ? ह्या काय माकडचेष्टा आरंभल्यात ?

**राजबहादुर** : बेटा, ही चेष्टा नव्हे रे ! ( एकदम हुंदके देत ) छे ! छे ! ही नोकरी म्हणजे मरण आहे मरण ! मरण पुरवलं पण...

[ वज्रसार प्रवेश करतो.

**वज्रसार** : पण आतां मरायलाहि फुरसत नाहीं. चला, उठा. कामिनीदेवी इथला बंदोबस्त पाहायला येणार आहेत, आत्तांच वर्दी आली. बंदोबस्तांत जरा कसूर दिसली तर डोकीं छाटलीं जातील ! याद राखा.

[ वज्रसार जातो.

**राजबहादुर** : ( उठून धांदलीनें ) चला—उठा ! रंगराज, माझी तरवार कुठं आहे ? पहारेकऱ्यांना इशारा द्या. कैद्यांची हजेरी घ्या. धांवा—पळा ! असा कडेकोट बंदोबस्त करा किं इथून तिथून मारे बोंबाबोंब उडाली पाहिजे !

[ रंगराज जातो. राजबहादुर जाऊं लागतो. तोंच संजय नंगी समशेर घेऊन प्रवेश करतो.

**संजय** : थांब. चाललास कुठं ? वज्रांगांना मला बंधमुक्त करायचं आहे. असा आ वासून पाहातोस काय ? तुरुंगाचा दरवाजा उघड...

**राजबहादुर** : पण कामिनीदेवी आत्तांच बंदोबस्त पाहायला येणार आहेत.

**संजय** : पण मी आलों आहे ना तुम्हां सर्वांचाच योग्य बंदोबस्त करायला ?

[ राजबहादुराला ओढीत नेतो. पडदा वर जातो. तुरुंगाच्या कोठडीत वज्रांग.

**वज्रांग** : कोण ? युवराज ?

**संजय** : ( राजबहादुरास ) कोठडीचं कुलूप काढ...काय नाहीं काढीत ?

**राजबहादुर** : ( घाबरून ) नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे ?...तुरुंगावरचा अधिकारी मी...ही माझ्या अधिकारांतली गोष्ट आहे !...ह्या पहा, किल्ल्यासुद्धां माझ्या हातांत आहेत...मी कुलूप उघडूं शकतों....पण—

**संजय** : पण काय ?

**राजबहादुर** : पण आतां काय सांगावं ? जरा स्पष्टच बोलतों, हा कायद्याचा

प्रश्न आहे...मी कायद्याची भाषा बोलतों आहे...आपणही कायदा जाणतां...

**संजय** : कायद्याच्या कांद्या! कुलूप काढ म्हणतों ना?

**राजबहादुर** : पण प्राण गेला तरी कायद्याच्या कचाट्यांत सांपडायचं नाहीं हा तर माझा कायदा आहे. कुलूप काय, उघड म्हणतांच उघडतों...

**संजय** : मग उघड ना?

**राजबहादुर** : पण उघड सांगतों कीं, प्रधानजींच्या हुकुमाखेरीज हें कुलूप ह्या राजबहादुराला उघडतां येत नाहीं...

**संजय** : अरे चोरा, तुला प्रधानजींचा हुकूम पाहिजे अं! प्रधानजी कोण! तो कालचा हुजऱ्या? कवडी किंमतीचा इंद्रजाल? काय न्याय आहे पाहा! राज्याचा मालक मी! मत्ता माझी आणि सत्ता मात्र त्या बाजारबुणग्यांची!

**राजबहादुर** : नाहीं—नाहीं. तसं कांहीं नाहीं. पण आहे हें आपलं असं आहे. त्यांचा दरारा फार. तेच आमचे मायबाप सरकार—

**संजय** : माबाप सरकार? पण हा इथं तुम्हां सर्वांचा बाप जिवंत आहे ना? मुकाट्यानं कुलूप काढ. नाहीं तर ह्याच कोठडींत डांबून कोरड्याच्या फटकाऱ्यांनीं तुझ्या अंगाची चामडी सोलून काढीन.

**राजबहादुर** : तुरुंगांत जाऊन फटके खाईन. पण मी कायद्याच्या दृष्टीनं कुणाचं फट् म्हणून घेणार नाहीं. माफ करा सरकार! पण आपणच सांगा, आपला हुकूम मी कसा मानावा?

**संजय** : ही तरवारच ह्याचा झणझणीत जबाब देईल. (तरवार उगारतो.)

**वज्रांग** : थांबा युवराज, माझ्यासाठीं हें साहस करूं नका.

**राजबहादुर** : माफ करा, सरकार, शिर सलामत ठेवा!

**संजय** : जास्त वटवट करूं नकोस. आधीं कुलूप काढ...

**राजबहादुर** : हें पाहा, तोंडाला कुलूप घातलं आणि हें कुलूप काढलं!

[ कोठडी उघडून पळून जातो. वज्रांग बाहेर येतो.

**वज्रांग** : युवराज, मला बंधमुक्त करून कृतांताच्या क्रोधाला कां पात्र होतां?

**संजय** : कृतांताचा क्रोध म्हणजे कांहीं परमेश्वराची अवकृपा नव्हे.

**वज्रांग** : पण सर्व प्रकारची सत्ता आज त्याच्या हातीं आहे. तो करील तो न्याय आणि बोलेल तो कायदा!

**संजय** : त्याचे कसले कायदे ? अस्मानीसुलतानी म्हणजे कायदा नव्हे. दोन दिवसांच्या सत्तेनं सजलेल्या नादानांच्या लहरीला मी मुळींच कायदा समजत नाहीं. कायदे प्रजेच्या कल्याणासाठीं, न्यायधर्माच्या संरक्षणासाठीं असतात. कायद्यांच्या कलमांना जुलमी शस्त्रांचं स्वरूप आलं तर ते कसले कायदे ? हे दडपशाहीचे क्रूर कायदे हा संजय ह्यापुढं असे पायाखालींच तुडविणार ! मी माझ्या जबाबदारीवर तुम्हांला बंधमुक्त केलं आहे.

**वज्रांग** : भावी सम्राटांना हा वज्रांग प्रमाण करीत आहे. (अभिवादन करतो.)

**संजय** : वज्रांग, हें काय ! तुम्हींच माझं खरं राज्यवैभव आहांत ! तुमच्या हृदयांतल्या दिव्य राजनिष्ठेच्या अमृतगंगेचा बिंदुमात्र जरी ह्या देववर्तातल्या प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत उचंबळून येईल तर हें कृतांताच्या पुंडाईचं बंड क्षणार्धांत नष्ट होईल.

[ कामिनी व वज्रसार कांहीं सशस्त्र शिपायांसह प्रवेश करतात.

**कामिनी** : पुंडाईचं बंड ? तुमचं कां आमचं ? शिपायांनों, पकडा ह्यांना—

**संजय** : खबरदार ! एक पाऊल पुढं टाकाल तर प्राणालाच मुकाल !

**कामिनी** : (कुर्यानें) मी राजभगिनी आहे ! माझी हुकमत चाललीच पाहिजे.

**संजय** : तूं त्या कृतांताची सख्खी बहीण आहेस, मला माहीत आहे. अखिल स्त्रीजातीला तूं आपल्या चमत्कारिक चारित्र्यानं लांछन लावलं आहेस—

**कामिनी** : माझी बेअदबी करणारी बाष्कळ जीभ मुळापासून उखडून निघेल. वज्रसार, ह्या तोतयाला इथल्या इथं ह्या तुरुंगांत डांबून टाका !

**संजय** : अहो राजभगिनी ! आपण चुकतांहात ! बंदिशाळेच्या भीतीनं दडपून जाण्यासारखं भ्याड हृदय ह्या संजयाजवळ आतां मुळींच राहिलेलं नाहीं ! आजपर्यंत तुम्ही मला कैदच करून टेविलं होतं. पण आतां तुमच्यासारख्या दुष्टांच्या दास्यांतून ह्या देवावर्तांची मुक्तता करण्यासाठीं...

**संजय** : तूं आतां नव्यानं देशभक्तीची दीक्षा घेतली आहेस, असंच ना ? पण असल्या बेगडी देशभक्तांना रसातळाला पोंचवायला कितीसा उशीर ? तुरुंगाची थोडी हवा दाखविली कीं तुमच्या देशभक्तीचे डळमळते डोलारे धडाधड कोसळून पडतील !

**संजय** : ह्या रंगेल राजभगिनीला राष्ट्रभक्तांच्या तेजस्वी अंतःकरणाची खरी कल्पना कुठून असणार !

**वज्रांग :** मायदेशासाठीं रण मांडणाऱ्या कर्मवीरांना, खुनशीपणानं कोंडून ठेवायला तुमचे हे टीचभर कैदखानें कुठवर पुरणार ?

**संजय :** अखिल ब्रम्हांडाच्याहि बंदिशाळेंत कोंडून न राहणाऱ्या मानधन वीरात्म्यांच्या मनोवृत्ति तुमच्या दडपशाहीमुळं अधिकाधिक उसळून असले शेंकडों कैदखाने केवळ इच्छाशक्तीनं उलथून मात्र पाडतील !

**कामिनी :** सैल जिभेनं बडबडलेले हे वीरतेचे बोल फोल आहेत. संजय, तूं आमचा कैदी आहेस ! शिपायांनों !...( शिपाई सरसावतात. )

**वज्रांग :** ( पुढें होऊन ) खबरदार ! हा वज्रांग आपल्या देहाची ढाल सरसावून इथं छातिठोक खडा असतांना युवराजांच्या अंगाला स्पर्श करण्याची कुणाची माय व्याली आहे ?

**कामिनी :** माझा अपमान ? ह्या राजभगिनीचा असा अपमान ?

**वज्रसार :** ह्या अपमानाचा सूड समशेरीनं घेतला जाईल—

**वज्रांग :** पण त्या आधीं तुम्हां सर्वांचंच शिरकाण होईल !

**कामिनी :** प्रत्यक्ष भावाशीं वैर ? रक्ताचं नातं विसरून...

**संजय :** वीराच्या जातीला नातीगोतीं नसतात !

**वज्रांग :** न्यायधर्माशीं वैर मांडून देशाचा दुष्मन् बनलेला हा राजद्रोही ! हा कर्मचांडाळ पाठीवर पाय देऊन आलेला प्रत्यक्ष भाऊ असला तरी ह्याच्या छाताडांत लाथ मारून ह्याला जमीनींत गाढलाच पाहिजे. ( एका शिपायाची तरवार हिसकावून घेऊन वज्रासराच्या अंगावर धांवतो. )

**संजय :** थांबा वज्रांग ! एका बेजबाबदार बायकोच्या बडबडीमुळं इरस पेटून हा रक्तपात करूं नका. कामिनी ! देवावर्ताचा हा युवराज तुला आज्ञा करीत आहे. हा आपला परिवार घेऊन एकदम चालती हो !

**कामिनी :** तुला कोणत्या हडळीनं झपाटलंय् मला ठाऊक आहे. ती संजीवनी...

**संजय :** नागिणी ! त्या देवतेचं पवित्र नांव उच्चारण्याचीदेखील तुझी पात्रता नाहीं ! जास्त जहर ओकशील तर प्राणालाच मुकशील ! आधीं दृष्टीसमोरून चालती हो—

**कामिनी :** ही चाललें. पण याद राख, दुखावलेल्या नागिणीचा दंश फार भयंकर असतो. ( चरफडत जाते. )

[ वज्रसारहि शिपायांसह जातो. पडदा पडतो. एका बाजूनें राजबहादुर लुगडें नेसून दबकत दबकत येतो. दुसऱ्या बाजूनें तारिणी येते.

**तारिणी** : ही कोण सटवी इथं तुरुंगाच्या आवारांत घुटमळते आहे ? समजलं. तरी म्हटलं आमचे हे अष्टौप्रहर तुरुंगांतच कां डांबून घेतात ? असल्या नाजुक नगरभवान्या अशा रात्रीं अपरात्रीं आयत्या चालून आल्यावर घरादाराची आठवण त्यांना होते कशाला ? ( जवळ जाऊन ) ए बाजारबसवे, खरं सांग, तूंच त्यांना आपल्या नादीं लावलंस ना ? त्यांच्या गळीं पडून, चांडाळणी, माझा किं ग गळा कापलास ! त्यांनीं एक म्हातारपणीं लाज सोडली पण तुला तरी कांहीं अब्रू ? पण तुला अब्रू असती तर अब्रूदारांच्या संसाराचीं सरणं रचीत अशी कां फिरली असतीस तूं ?

**राजबहादुर** : अरेच्या ! ही तर आमची ही !

**तारिणी** : बरी सांपडलीस सपाट्यांत ! चांगलीच कणीक तिंबतें तुझी...

[ राजबहादुराला मारूं लागते.

**राजबहादुर** : अग बायको, पुरे, पुरे ! नवरा म्हणजे देवासारखा ! म्हणून त्याची अशी पूजा बांधतेस ?

**तारिणी** : इश्श ! म्हणजे ? तुम्हीच का ते ? मला वाटलं, तुम्हाला नादीं लावणारी कुणी नाटकसाळ अवदसा...पण पुरुषासारखे पुरुष तुम्ही ! अन् तुम्हाला ही अवदसा कां आठवली ?

**राजबहादुर** : पण लाडके, खरं सांग. हें माझं सोंग यथासांग वठलंय् कीं नाहीं ? ही डोळे मोडीत चालण्याची ढब, माना ओवाळीत बोलण्याची लकब...

**तारिणी** : शरम नाहीं वाटत, असा हिजड्यासारखा हैदोस घालायला ?

**राजबहादुर** : शरम ? जिवावर बेतल्यावर कसली शरम ?

**तारिणी** : म्हणजे ?

**राजबहादुर** : त्याचं असं झालं, युवराजांनीं वज्रांगाची सुटका केली—

**तारिणी** : खरंच ? देव पावला बाई !

**राजबहादुर** : पण माझ्यावर आली देवज्ञेची पाळी ! तें प्रकरण शेकणार माझ्या अंगावर...इंद्रजालांचे पाय धरण्याखेरीज तरणोपाय नाहीं...

**तारिणी** : म्हणून डोकं लढवून हा उपाय काढलांत वाटतं ?

**राजबहादुर** : हो—आतां निदान जिवाला तरी अपाय होण्याची धास्ती नाहीं.

**तारिणी** : ती कशी ?

**राजबहादुर** : बायकांच्या बाबतींत इंद्रजाल अगदींच ढिले !...बांगड्यांचा आवाज ऐकला नि नखरेबाज शृंगारसाज पाहिला कीं राजेश्री विरघळलेच ! तेव्हां त्यांचं तें वर्म ओळखून हें महाकर्म आरंभलं...त्या आग्यावेताळाला खूष करण्यासाठीं घटकाभर बायको बनायला आपलं काय-बिघडलं ?

**तारिणी** : डोंबलं तुमचं ? सैतानाची चाकरी नि मानेवर सुरी ! द्या राजिनामा नि व्हा मोकळे !

**राजबहादुर** : राजिनामा ? पण मला फांसावर टांगण्याचाच होणार हुकूमनामा ! त्याची वाट ? हो...तुला पाहून मला आणखी एक हिकमत सुचली. तूंहि माझ्या बरोबर इंद्रजालांकडे चल...

**तारिणी** : कशाला ?

**राजबहादुर** : माझ्यासाठीं रदबदली करायला ! तूं त्यांची मनधरणी कर... मी त्यांची पायधरणी करतो. दुहेरी इलाज !

**तारिणी** : अहो, कांहीं लाज ? आग लागो तुमच्या जिभेला !

**राजबहादुर** : अग हें राजकारण आहे !

**तारिणी** : घाला चुलींत तुमचं राजकारण ! स्वार्थासाठीं घरच्या बायकांना बाजारांत विकणाऱ्या तुमच्यासारख्या पाजी पुरुषांना जिवंत जाळलं पाहिजे !

**राजबहादुर** : अग, बांगडीचा दांडगा वशिला लावणारा जगांत काय मीच पहिला पुरुष आहे ? ह्या वशिलाच्या जोरावर जगांत कित्येकांनीं स्वर्गाला हात घातला आहे ! मी तर स्वर्गारोहण चुकविण्यासाठीं हा वशिला योजणार आहे.

**तारिणी** : नवरे कसले, साता जन्मींचे दुश्मान् तुम्ही !

**राजबहादुर** : एकंदरींत बायकांना डोकं कमीच !

**तारिणी** : तुमचं हें डोकं...घाणीचं मडकं...

**राजबहादुर** : नवऱ्याच्या जिवासाठीं एवढी साधी गोष्ट करायला तूं तयार नाहींस ? माझी खात्रीच झाली कीं तूं पतिव्रता नाहींस...

**तारिणी** : अन् माझीहि खात्रीच झाली कीं तुम्ही माणूस नाहीं.

[ तावातावानें जाते. दुसरीकडून रंगराज गडबडीनें येतो.

**रंगराज :** हा राजबहादुर गेला कुठं ? ( पाहून ) पण ही बाई कोण इथं ? तारिणीबाईच दिसते. बिचारीला नवऱ्यावरचं प्राणसंकट कळलं वाटतं ? ( जवळ जाऊन ) तारिणीबाई, राजबहादुर कुठं आहेत ?

**राजबहादुर :** ( बायकी आवाजांत ) ते झाले फरारी !

**रंगराज :** फार उत्तम झालं. आत्तां माझा जीव खालीं पडला.

**राजबहादुर :** पण माझा जीव इकडें कंठांशीं येऊन भिडला !

**रंगराज :** तारिणीबाई, तुमच्याविषयीं मला प्रेम वाटतं म्हणून सांगतों—

**राजबहादुर :** मोकळ्या मनानं बोला. बिलकूल संकोच करूं नका...

**रंगराज :** हा राजबहादुर शुद्ध गाढव आहे. काडीची अक्कल नाहीं त्याला. तुम्ही एक सुंदर रत्न आहांत पण त्या माकडाला त्याचं मोल नाहीं...

**राजबहादुर :** कसं बाई माझ्या अगदीं मनांतलं बोललांत ! तुम्ही कित्ती कित्ती चांगले आहांत हो ! मला किनई फार फार आवडतां तुम्ही...तुम्हाला पाहिलं कीं मला कसंसच होतं...जरा जवळ या ना गडे !

**रंगराज :** ( चमकून ) गडे ?

**राजबहादुर :** तुम्हाला पाहिलं कीं वाटतं...

**रंगराज :** ( घाबरून ) काय वाटतं ?

**राजबहादुर :** ( मुरका मारून ) मला बाई लाज वाटते सांगायला...

**रंगराज :** अहो, सांगून टाका. काय वाटतं तुम्हाला ?

**राजबहादुर :** ( मिठी मारून ) अशी एकदम मिठीच मारावी तुम्हाला...

**रंगराज :** बाप रे ! हें काय धर्म करतां कर्म ! अहो, तारिणीबाई, हें काय भलतंच ! सोडा मला...अशा एकदम गळ्यांत काय पडतां ?

**राजबहादुर :** जिवलगा ! प्राणेश्वरा !

**रंगराज :** मेलों ! ठार झालों ! अहो, सोडा...मला घेरी आली...माझा पित्ताचा विकार बळावला... ( झिडकारून दूर होतो. )

**राजबहादुर :** माझंसुद्धां पित्तच खवळंलय् ! लबाड लफंग्या ! ही बघ तुझी तारिणीबाई !

**रंगराज :** कोण ? राजबहादुर ?

**राजबहादुर** : माझी निंदानालस्ती अन् तारिणीची स्तुति! दोस्तीचा जिव्हाळा नि बायकोवर डोळा? अरे छाटक्या!

**रंगराज** : अहो, काय बरळतां हें?

**राजबहादुर** : हरामखोरा, तुझी गठडीच वळतों. तारिणीशीं हितगुज?

**रंगराज** : अहो, तुमच्याच हितासाठीं! डोकं ठिकाणावर ठेवा...

**राजबहादुर** : माझं डोकं ठिकाणावर आहे पण आतां तुझं डोकं मात्र मी ठिकाणावर ठेवीत नाहीं...

**रंगराज** : आधीं आपल्या जिवावरचा अनर्थ टाळा नि मग हा अर्थाचा अनर्थ करीत बसा! इंद्रजाल येताहेत. तुम्हाला अगाऊ वर्दी द्यायला आलों...

**राजबहादुर** : (घाबरून) इंद्रजाल इकडेच येणार? कामिनीदेवी येऊन गेली...त्या हडळीच्या पाठोपाठ हा तिचा भुत्या...

**रंगराज** : सुईमागून दोरा! म्हणून म्हणतों, जिवंत राहायचं असेल तर...

**राजबहादुर** : तर आणखी काय करूं? हें केलंय् ना?

**रंगराज** : लुगडं नेसून बांगड्या भरल्यात?

**राजबहादुर** : अरे, खुशामतीच्या तंत्रांतलं हें अमोघ अस्त्र आहे! वेळप्रसंगीं वीराचं वज्रकंकण कामीं येत नाहीं पण ह्या बांगड्या...

**रंगराज** : अहो बांगडीबहादुर! तें पाहा, इंद्रजालच आले...नमती डोकेफोड पुरे करा. नाहींतर भ्रमाच्या भोपळ्याबरोबरच डोक्याचाहि नारळ फुटून स्वर्गाला जायचा शुभ शकुन व्हायचा!

**राजबहादुर** : बायकोच्या कुंकवाचं बळ काय असेल तें खरं!

[ इंद्रजाल येतो. रंगराज बाजूला लपतो.

**इंद्रजाल** : (राजबहादुरास) कोण तूं? प्रश्नाला उत्तर नाहीं?

**राजबहादुर** : (बायकी स्वरांत) क्षमा करा...सरकार! क्षमा करा...

**इंद्रजाल** : अस्सं! एकूण संजीवनीच तूं! वज्रांगाच्या जीवदानाचा जोगवा मागायला अखेर नाक घाशीत आलीस म्हणायची! पण वज्रांगाची सुटका तर नाहींच होणार पण तुला मात्र माझी शृंगारशेज साजरी करावी लागणार!

**राजबहादुर** : सरकार...सरकार!

**इंद्रजाल** : तुला अशी कुत्रीसारखी फरफटत ओढून नेऊन—

**राजबहादुर** : हां–हां ! हुजूर, माफ करा ! मी संजीवनी नव्हे ! राजबहादुर !

**इंद्रजाल** : कोण ? राजबहादुर ? बेवकूफ ! ही विद्या कुठं पैदा केलीस ?

**राजबहादुर** : (एकदम त्याचे पाय चुरूं लागून) हुजूरच्या चरणसेवेसाठीं ! (लडिवाळपणानें) पण हुजूर, मला क्षमा करायची हं ! करणार ना मला क्षमा ? एक छोटासा गुन्हा घडलाय् माझ्या हातून...

**इंद्रजाल** : गुन्हा ? तो कोणता ?

**राजबहादुर** : वज्रांग फरारी झाला !

**इंद्रजाल** : (त्वेषानें लाथ हाणून) काय सांगतोस ? वज्रांग फरारी झाला ?

**राजबहादुर** : युवराजांनीं त्याची सुटका केली !

**इंद्रजाल** : पण नामर्दा ! तूं काय करीत होतास ? अशाच बांगड्या भरून बसला होतास ? तुझ्या हातांत तरवार होती ना ?

**राजबहादुर** : तरवार होती ना...पण ती माझ्या नव्हे तर युवराजांच्या हातांत होती ! म्हणून तर हा घोंटाळा झाला...हुजूर, क्षमा करा...

**इंद्रजाल** : फरारी कैद्याला जिवंत पकडून आण. नाहींतर तुझी मुंडी छाटून टाकीन ! वज्रांगाची सुटका झाली ! (स्वतःशी पुटपुटत रागानें निघून जातो.)

**राजबहादुर** : तरी बरं, हें सोंग बरंचसं सार्थकीं लागलं !

**रंगराज** : शेपटीवरच भागलं ! (जातात.)

## [ ३ ]

भीमरुद्राच्या किल्ल्यांतील महाल. कृतांत विचारमग्न. जवळ कामिनीदेवी.

**कामिनी** : दादा, हें रे काय ? जेव्हां पाहावं तेव्हां तूं आपला कपाळाला हात लावून विचार करीत बसलेला. अलीकडे तुला झालंय् तरी काय ?

**कृतांत** : मनाएवढा ग्वाही त्रिभुवनांत नाहीं. मस्तकावर घणाचे घाव घातल्यासारखं होत आहे. संजयाच्या जन्मसिद्ध हक्कांची पायमल्ली मी चालवली, त्यामुळं खवळलेल्या जनतेनं माझ्याविरुद्ध चळवळ आरंभिली. राजधानींत राहणं मला धोक्याचं वाटलं म्हणून मी ह्या भीमरुद्राच्या किल्ल्यांत येऊन राहिलों—

**कामिनी** : अरे, चळवळ्या जनतेला एवढं काय भितोस ? धनंजयाला एकदां राज्याभिषेक झाला कीं...

**कृतांत** : तो विचारच तूर्त नको.

**कामिनी** : म्हणजे ! तुला वेड तर लागलं नाहीं ? किती रे अवसानघातकी, दुबळ्या दिलाचा तूं ! हातांत बांगड्या भर. नाहीं तर संन्यास घेऊन स्वस्थ बैस. मी चालवितें तुझं राज्य. तूं असा भेकड, म्हणून तर संजय वज्रांगा-सारखीं पोरं थोरं माझा, प्रत्यक्ष तुझ्या लाडक्या बहिणीचा पाहिजे तसा तोंडा-वर पाणउतारा करतात. मी म्हणजे कोण्या झाडाचा पाला ! परवांच त्या संजयानं माझी कशी नाचक्की केली, तुला सांगितलं ना ? पण तुला कांहीं त्याची चाड ! ( डोळ्याला पदर लावून एकदम हुंदके देऊं लागते. )

**कृतांत** : ताई, ताई, हें काय वेड्यासारखं ? पूस पाहूं डोळे. ( तिचे डोळे पुसतो. ) आजपासून तूं आणि इंद्रजाल कराल तें प्रमाण. तुमचीच सत्ता सर्वत्र चालली पाहिजे.

**कामिनी** : माझा शब्द म्हणजेच कायदा ! अस्सं झालं पाहिजे.

**कृतांत** : तुमची आज्ञा अमान्य करणारांना तुम्ही वाटेल तें शासन करा. मी मध्यें बोलणार नाहीं.

**कामिनी** : तुझ्या हितासाठींच आम्हीं सारं कांहीं करणार.

**कृतांत** : तुमची कळकळ मला कळत का नाहीं ? आजवर तुमची इच्छा मी कधीं मोडली आहे का ?

**कामिनी** : तें खरं. पण कांहीं केल्या तूं आपल्या आंखल्या ध्येयापासून ढळूं नकोस. धनंजयाच्या डोक्यावर मुकुट चढला कीं...

**कृतांत** : तुझ्याहि डोक्यावर विवाहाक्षता पडून तुझं नि इंद्रजालांचं शुभमंगल—

**कामिनी** : ( लाजून ) तुझं आपलं कांहीं तरीच.

**कृतांत** : हां—हां. अशी लाजूं नकोस.

**कामिनी** : मी आपली जातेंच कशी—( जाऊं लागते. )

**कृतांत** : थांब, थांब. जाऊं नकोस. तूं आणि इंद्रजाल, तुम्ही जवळ असलांत कीं मला मोठा धीर येतो. पण तुमच्यापैकीं कोणीच जवळ नसलं तर मग मात्र वेगळेच विचार डोक्यांत थैमान घालूं लागतात.

[ इंद्रजाल येतो.

**इंद्रजाल** : घात झाला, सरकार, घात झाला ! आपल्याच हातानं आपल्या गळ्याला हात घातला.

**कृतांत** : संजयानं वज्रांगांची मुक्तता केली हेंच तुम्ही मला सांगणार ना ?

**इंद्रजाल** : पण आतां शक्तिसिंहाच्या चळवळीला जोर चढणार. राजरोस बंडाळीची धुमश्चक्री सर्वत्र फैलावणार. परिस्थितीचं स्वरूप फारच उग्र—

**कृतांत** : तुम्हांला सुचेल रुचेल तें करा. नाहींतर संजयालाच राज्याभिषेक—

**इंद्रजाल** : सरकार, हे काय भलतेच निराशेचे उद्गार !

**कामिनी** : दादाच्या बहकल्या बुद्धीला वेळींच आळा घातला पाहिजे. राजकारणी मुत्सद्याचं मन कसं वज्रासारखं खंबीर हवं हें कुठं ह्याला् कळतंयू ?

[ राजबहादुर येतो.

**राजबहादुर** : हुजूर, कळविण्यास अत्यंत वाईट वाटतं कीं वज्रांग बेपत्ता आहे. त्याचं क्षेम–कुशल कळण्यास कांहींच मार्ग नाहीं.

**इंद्रजाल** : पण त्याला जिवंत पकडायचा मी तुला हुकूम दिला होता ना ?

**राजबहादुर** : हो–पण तो मेला असं समजून त्याचा नाद मी सोडून दिला.

[ वज्रसार येतो.

**वज्रसार** : सरकार, महत्त्वाची बातमी. संजय आणि वज्रांग शक्तिसिंहाच्या कारस्थानांत सामील झाले असून त्यांच्या चिथावणीनं लोकांनीं बंड उभारण्याचा उद्योग आरंभला आहे. कालकंदरीच्या गुहेंत त्यांचं गुप्त वास्तव्य असून तेंच त्यांच्या चळवळीचं केंद्र आहे. सर्वत्र संजयाचा जयजयकार सुरू असून सरकारचा धिक्कार चालला आहे !

**कृतांत** : अराजक बंडखोरांच्या चळवळीची मजल एथपर्यंत आली अं !

**इंद्रजाल** : जनतेवर जबरदस्त दहशत बसविल्याखेरीज सार्वभौम सत्तेला आतां गत्यंतरच नाहीं.

**कृतांत** : ( त्वेषानें ) साऱ्या पुढाऱ्यांना गिरफदार करा. तुमच्या मार्गांत आड येतील त्यांच्या घरादारावरून बेलाशक गाढवाचे नांगर फिरवा.

**कामिनी** : सारा देवावर्त बेचिराख झाला तरी बेहेत्तर ! पण दादाची सम्राट्–सत्ता तिळभरसुद्धां डळमळतां उपयोगी नाहीं.

**कृतांत** : ( वज्रसारास ) पण त्या संजीवनीचा काय पत्ता ?

**वज्रसार** : संजीवनी तर विजेच्या वेगानं बंडाळीचा वणवा चहूंकडे पेटवीत हिंडत आहे. ठिकठिकाणीं लोकांचे प्रचंड जमाव जमवून जाहीरपणें साम्राज्याविरुद्ध बंड पुकारण्याचा ती उपदेश करते आहे.

**कृतांत** : वज्रसार, मी तुला सेनापतीचा अधिकार देत आहें. सैन्याच्या मदतीनं फितूर प्रजेला तरवारीच्या धारेवर धरण्याची तुला कुलमुखत्यारी आहे.

**वज्रसार** : हा दासानुदास ह्या बहुमानाबद्दल सम्राटांचा अत्यंत ऋणी आहे.

**राजबहादुर** : ( इंद्रजालास एकीकडे ) हुजूर, संजीवनीला पकडायची कामगिरी ह्या पठ्याला सांगा. बायकांच्या बाबतींत माझी नजर कशी कावळ्यासारखी आहे, हुजूरना ठाऊकच आहे. माझ्या नजरेच्या नेमांतून एकसुद्धां बरी वाईट बायको बेपत्ता होणं शक्य नाहीं. नाकानं कांदे सोलणाऱ्या कोणत्याहि कुर्रेबाज फटाकडीला झिपरीला कांदे बांधून हुजूरपुढं नाहीं हजर केली तर नांवाचा राजबहादुरच नव्हे. पण तसा अधिकार मात्र द्यावा—

**इंद्रजाल** : वज्रसार, कालकंदरीला चौफेर सैन्याचा गराडा घाला. जागजागीं नाकेबंदी करा. आणि राजबहादुर, गुप्त हेरांची टोळी घेऊन तूं चहूंकडे नीट टेहेळणी ठेव.

**कामिनी** : ( राजबहादुरास ) संजीवनीला पकडायचं काम तुझं. ( वज्रसारास ) संजयाला गिरफदार करण्याची कामगिरी तुमच्याकडे.

**कृतांत** : इंद्रजाल, साम-दामादि उपाय योजून जनतेचं एकवटलेलं सामर्थ्य क्षीण होईल असं कांहीं तरी करा. फोडा आणि झोडा, हेंच तत्त्व अमलांत आणा. पुढाऱ्यांत फूट पाडा. लोकांना मेंढरासारखे कैदेंत कोंडा—

**इंद्रजाल** : महाराजांनीं बेफिकीर असावं. सगळ्या बंडखोरांचीं ठेचलेलीं मुंडकीं चार दिवसांच्या आंत महाराजांच्या पायाशीं लाथाडून पाडतों—

**कृतांत** : पण आधीं क्रांतिकारक चळवळीच्या त्या जिवंत स्फूर्तीला...

**कामिनी** : संजीवनीला कायमची मूठमाती दिली पाहिजे !

[ सर्व जातात. कृतांतही आवेशानें जाऊं लागतो पण चपापून हळूं हळूं मागें हटतो. शांतपणें संजीवनी प्रवेश करते.

**संजीवनी** : पाहा पाहा, कृतांत महाराज, अधःपतन पावलेल्या आपल्या कमकुवत राक्षसी हृदयाचं प्रदर्शन नीट पाहा ! आपल्या आवेशाचा झरा असा

एकाएकीं कां आटला ! शरीराबरोबरच जीवसुद्धां थबकून मागें कां हटला ! बोला, कोणते विचार आपणाला कोणत्या मार्गाकडे घेऊन चालले होते ?

**कृतांत** : इथं येण्याचं धाडस तरी तुझ्यानं कसं झालं ? बोल, कशी आलीस ?

**संजीवनी** : मी कशी आलें हा महत्त्वाचा प्रश्न नसून, मी कशासाठीं आलें हा प्रश्न महत्त्वाचा आहे. पण आधीं मी विचारलेल्या प्रश्नाचं उत्तर मला मिळालं पाहिजे. आपण कोणत्या विचारांत होतां ?

**कृतांत** : मी महत्त्वाच्या राजकारणांत गढून गेलों होतों...

**संजीवनी** : राजकारण ? नादान मंत्रिमंडळाच्या ओंजळीनं पाणी पिणाऱ्या ऐषारामी, ऐदी राजांना कसलं आलंय् राजकारण ? पण खरं खरं सांगा. त्या तुमच्या राजकारणी रहस्यांत माझाच समावेश प्रामुख्यानं होत होता ना ?

**कृतांत** : माझी जबानी घेतेस ?

**संजीवनी** : होय. तुमची–सार्वभौम कृतांतांची मी जबानी घेत आहे. कर्त-व्याची जबाबदारी झुगारून अन्यायानं सिंहासनं बळकावून बसणाऱ्या राजांची जबानी घेण्याचा हक्क प्रत्येक प्रजाजनाला असतो.

**कृतांत** : त्या हक्काला पायाखालीं तुडवून सांगतों कीं तुझ्यासारख्या बंडखोर डाकिणीचं डोकं ठेचून टाकण्यासाठींच—

**संजीवनी** : मग सम्राटांना एवढे श्रम कशाला ? ही संजीवनी तुमच्या समोर बेदरकार उभी आहे. उपसा समशेर आणि गाजवा आपला पराक्रम ह्या एका अनाथ अबलेवर !

**कृतांत** : माझ्या क्रोधाची कसोटी पाहाशील तर फुकट मरशील !

**संजीवनी** : मृत्यूची दहशत मला ? ह्या संजीवनीला भेडसावण्याचं सामर्थ्य ह्या कृतांतांत तर नाहींच पण त्या कृतांतकाळांतसुद्धां नाहीं ! मरणाचं प्रस्थान ठेवूनच मी ह्या राजवाड्यांत जिवंत जुलूमशाहीशीं झुंज खेळण्यासाठीं पाय ठेवला आहे. एक सोडून लाख मृत्यु पायाशीं लोळवणारी ही संजीवनी आनंदानं आत्मबलि देईल—पण एका अटीवर—मरणाच्या मोलानं सत्कार्याचं श्रेय संपादन करतां आलं तरच त्या मरणाचं खरं चीज ! कृतांतराय, आपल्या दुष्ट करणीनं अंधारकोठडींत पिचत पाडलेल्या ह्या

देवावर्ताच्या जिवंत पुण्याईची—धारिणीदेवीची मुक्तता करण्याचं मला आधीं आश्वासन द्या !

**कृतांत** : तुझ्यासारख्या एका उद्दाम पोरीच्या बडबडीनं भेदरून जाऊन धारिणीची सुटका करण्याइतका मी खास स्त्रैण बुद्धीचा नाहीं. शिवाय, तो माझ्या इभ्रतीचा प्रश्न आहे.

**संजीवनी** : इभ्रत ? दुष्कीर्तीचे चौघडे चहुंमुलुखीं अखंड झडत असतांना खोट्या इभ्रतीचे पोवाडे आपले आपणच बरळण्यांत कोणता पुरुषार्थ आहे ? विश्वासघातानं दुसऱ्याचं सिंहासन बळकावणारा—महत्त्वाकांक्षेच्या क्रूर कवटाळणीला कवटाळून मायाममतेचे पाश तोडणारा—धर्मपत्नीला दुःखाच्या खाईत लोटणारा—एक निर्दय कसाई ! त्याला इभ्रतीचा माणूस म्हणायचं—मग सैतानाला देवपणाचा दाखला कां द्यायचा नाहीं ?

**कृतांत** : बस्स ! जीभ हांसडून टाकीन जास्त बोलशील तर—

**संजीवनी** : माझी जीभ हांसडल्यानं तुमच्या पापांचा पाढा कुणी वाचणार नाहीं असं का तुम्हाला वाटतं ? ब्रह्मांडाला वाचा फुटेल—समजलांत ?

**कृतांत** : थांब, तुझा कायमचाच निकाल लावतों—

**संजीवनी** : कृतांतराय ! भलता भ्रम सोडून द्या—( हंसून ) धारिणीदेवीची सुटका माझ्या हातून ह्या क्षणाला झालीच म्हणून समजा !

**कृतांत** : पण माझ्या हातून जिवंतपणीं तुझी सुटका होईल तेव्हां ना ?

[ तरवार उपसतो. इतक्यांत संजय ‘ खबरदार ’ असें म्हणून तरवार रोंखीत प्रवेशतो. संजीवनी निघून जाते.

**कृतांत** : तूं कोण ?

**संजय** : आधीं ती तरवार म्यान कर. कोणत्याही अत्याचारी हेतूनं हालचाल करूं नकोस. सर्वत्र सामसूम आहे. ह्या वेळीं कुणीही तुझ्या हांकेला धांवून येईल ही अंधुक आशाही धरूं नकोस. तुझे प्राण घेण्याचा माझा इरादा नाहीं. तुझ्याच नव्हे तर कुणाच्याच रक्तानं माझी तरवार विटाळूं नये, हीच माझी निरंतरची इच्छा आहे—

**कृतांत** : पण तूं आहेस तरी कोण ?

**संजय** : ( डोळ्यावरचा काळा पडदा काढून ) हा पहा कोण तो ?

**कृतांत** : कोण ? बंडखोर संजय ?

**संजय** : होय. तुझ्याच करणीमुळं बंडखोर बनलेला हा संजय !

**कृतांत** : पण हें विलक्षण धाडस करण्याचं कारण ?

**संजय** : केवळ तुझ्याच हिताचा इशारा तुला देण्यासाठीं—

**कृतांत** : माझ्या हिताची बेगडी कळकळ दाखवूं नकोस. मी ओळखून आहे. राज्याची भीक मागायला तूं आला आहेस—

**संजय** : राज्याची भीक ? स्वराज्य असं भिकेची झोळी पसरून मागून मिळत नसतं. तें स्वतःच्या योग्यतेनं–हक्कानं मिळवायचं असतं, मला ठाऊक आहे. मी देवावर्ताचा राजा आहे. राजा भीक मागत नसतो–भीक वाढत असतो ! क्षात्रवीराचा धर्म दान घेण्याचा नसून दान देण्याचा आहे. स्वराज्याला मी अद्यापि तुझ्या मतें अपात्र आहें ना ? मग माझी पात्रता मी सिद्ध करीन अन् नंतरच तुझ्या मस्तकावरचा मुकुट मी माझ्या मस्तकावर हक्कानं चढवीन ! आणि कृतांतराय, तुझी इच्छाच असेल तर हा संजय तुला ह्या क्षणीं देवावर्ताचं साम्राज्य दान करीत आहे ! पण कृपा करून प्रजेचा राक्षसी छळ थांबव. गोरगरिबांची गांजणूक—दीनदुबळ्यांची दैना ह्या डोळ्यांनीं पाहावत नाहीं रे ! आपला सारा सूड ह्या संजयावर उगवून घे. पण देवावर्ताच्या दीन प्रजेनें तुझा कोणता अपराध केला आहे ?...अजून तरी सावध हो ! नाहींतर आपल्या कृतकर्मांचे भयंकर परिणाम भोगायला तयार राहा !

**कृतांत** : माझी चिंता तुला नको. तूं मात्र आतां नेस्तनाबूत होणार...

**संजय** : तुझ्या तरवारीला सहजासहजीं बळी पडण्याइतका हा संजय दुबळा नाहीं. शिवाय, तुझ्या अंतःकरणाची भ्याड जात मी ओळखून आहें. पापांची परवड रचणाऱ्या नर-राक्षसांचीं अंतःकरणं सत्याच्या दैवी सामर्थ्याशीं सामना देण्याइतकीं तेजस्वी नसतात !

[ इतक्यांत घाईघाईनें कामिनी येतें.

**कामिनी** : दादा दादा...अगबाई ! पण हा कोण ?

**संजय** : मी तो आपला बंडखोर संजय...

[ मोठ्यानें हंसत एकदम निघून जातो.

**कामिनी** : शिपायांनो, त्या बंडखोराला ठार करा–जिवंत सोडूं नका.

[ धारिणी प्रवेशते.

**धारिणी** : थांबा !

**कामिनी** : कोण ? वहिनी !

**कृतांत** : धारिणी !

**कामिनी** : पण हिची सुटका केली कुणी ?

**कृतांत** : खास त्या संजीवनीनंच !–आधीं हिचाच पक्का बंदोबस्त करा ! हिला तळघरांत डांबून टाका. संजीवनीलाच काय पण तिच्या बापालाहि पुन्हा हिचा थांगपत्ता लागतां उपयोगी नाहीं.

**कामिनी** : पण इतकं कशाला ? मीच हिचं नरडं दाबून जीव घेतें—

[ अंगावर धांवून जाते. तोंच धनंजय नंगी तरवार घेऊन धांवत येतो.

**धनंजय** : खबरदार ! आईच्या एका केंसालाहि धक्का लागेल तर तुमचं मुडदाच पडेल !

[ तरवार रोखतो. सर्वजण आश्चर्यचकित होतात. पडदा पडतो.

# ३

कालकंदरीचा प्रदेश. रस्ता. राजबहादुर व रंगराज येतात. सायंकाळची वेळ.

**रंगराज** : सगळा दिवस पायपीट केली. सारी कालकंदरी पालथी घातली—

**राजबहादुर** : पण ती हडळ, संजीवनी कुठं पालथी पडलीय् देव जाणे !

**रंगराज** : हडळी-डांकिणींचा संचार रात्रींच सुरूं व्हायचा !

**राजबहादुर** : मग आतां रात्रीला काय शिंगं आहेत ? कदाचित् मध्य-रात्र सुद्धां झाली असेल—

**रंगराज** : खरं आहे. ह्या घनदाट अरण्यांत तें कळणार कसं ? प्रकाशाला इथं कायमचा मज्जाव...चला तर, चुटकीसरशी त्या चेटकिणीचा पत्ता लावूंया !

**राजबहादुर :** आस्ते कदम ! बेटा, आस्ते कदम ! शिस्त सोडूं नकोस. प्राण गेला तरी सरकारी शिस्त सोडूं नकोस ! अशा उंटासारख्या लांब टांगा टाकून डोकीवर पाय घेऊन पळत सुटशील तर तंगड्या गळ्यांत येतील ! सावकाश चाल. लागला पळायला घोड्यासारखा !

**रंगराज :** घोडचूक झाली माझी. पण तुम्ही तर अगदीं मुंगीच्या पावलानं हत्तीसारखे डुलत झुलत चालतांहात !...

**राजबहादुर :** पण हत्तीच्या पायाखालीं मुंगी दिखील मरत नसते ! अशी चोरटी चाल पाहिजे...

**रंगराज :** बड्या लोकांची चाल-चलणूक अशी चोरटी असते म्हणायची ! पण काय हो, आज हा विचित्र वेष कां केलांत ?...आणि एकंदर वागणुकीची तऱ्हाहि थोडी तऱ्हेवाईकपणाचीच दिसतेय्...

**राजबहादुर :** अरे, जसा कामगिरीचा रंग तसा वागणुकीचा ढंग !

**रंगराज :** पण अगदीं नखशिखांत नवा नूर...

**राजबहादुर :** त्या संजीवनीच्या नरडीला नख द्यायचं आहे ना ?

**रंगराज :** पण नरडीला नख द्यायला तिचं नख तरी दृष्टीला पडायला हवं ना?

**राजबहादुर :** अरे, ती जाते कुठं ? आज मी कोण आहे ?

**रंगराज :** गुप्त हेरांचा नायक !

**राजबहादुर :** मग ? गुप्त हेर म्हणजे तूं कोण समजलास ?

**रंगराज :** प्रति परमेश्वर !

**राजबहादुर :** छट् ! परमेश्वरापेक्षांहि थोर ! त्या अनंत-लीला-लाघवी परमेश्वरालाही चकित करून सोडणारे अजब चमत्कार गुप्त हेर सहज लीलंया करून दाखवितो !

**रंगराज :** तें बरीक खरं. वाटेल त्याचा हात धरून हातोहात गळा कांपण्यांत गुप्त हेराचा हात कुणीच धरणार नाहीं !

**राजबहादुर :** अलबत् ! मन मानेल त्याच्या मानेवरून सूडाची सुरी फिरवून त्याला कायद्याच्या भट्टींत भाजून काढणं ही तर आमची खरी करामत !

**रंगराज :** अन् कुणावरही कसलीही तोहमत घेणं ही तर खरी शहामत !

**राजबहादुर :** ह्या नवीन अधिकाराच्या जोरावर मी तर खुद्द बायको

वरही खासगी सूड उगवून घेणार आहे ! मनांत आणील तर हा राजबहादुर तुलासुद्धां इथल्या इथं गिरफदार करील !

**रंगराज :** पण माझ्या हातून कांहीं गुन्हा तर घडला पाहिजे ना ?

**राजबहादुर :** गुन्हा घडायला नकोच. नुसत्या संशयावरून अटक नि थेट दाखवायचं तुरुंगाचं फाटक ! अन् मग सावकाश चौकशीचं नाटक !

**रंगराज :** खासा न्याय ! चोर सोडून संन्यासी सुळीं !

**राजबहादुर :** त्याशिवाय कशी पिकणार आमची पोळी ? कांहींतरी खरीखोटी कामगिरी वरिष्ठांना दाखवायला हवीच !

**रंगराज :** मग आतां संजीवनी नाहींच मिळाली तर...

**राजबहादुर :** नगास नग म्हणून दुसरी कुणी तरी पोरटी करायची हजर !

**रंगराज :** हो पण...त्या पाहा, कुणी तरी दोन व्यक्ति इकडेच येताहेत. एक बाई दिसते. पण दुसरी व्यक्ति कोण ? बाई कीं बुवा ?

**राजबहादुर :** हा वाद कशाला हवा ? प्रत्यक्षच कळेल कीं ! मी आतां अशी खुबीनं किल्ली फिरवितों कीं यँव् ! तूं मात्र तोंडाला कुलूप घाल. चल, जरा त्या झाडाआड दडूंया...

[ दोघे जातात. पुरुषवेषांत संजीवनी तारिणीसह येते.

**संजीवनी :** तारिणी, तूं जा आतां परत. हा रस्ता माझ्या पायाखालचा झाला आहे. शिवाय, शक्तिसिंहाची गुहा आतां फार दूर नाहीं येथून. तूं जा परत...अंधार पडत चाललाय्...

**तारिणी :** पण तुम्हाला थेटपर्यंत सोबत करण्याची धारिणीदेवींची मला आज्ञा आहे. मी नाहीं परतणार—पण मी म्हणतें, ताईसाहेब, अशा वेषांतरानं कुठवर निभावणार ? जागोजाग दगा–फटका...

**संजीवनी :** अग, देशाचं दैन्य स्वतःच्या रक्तानं धुवून काढण्याचा प्रसंग आला तर फार छान ! देव, देश, धर्म, राजा ह्यांचं ऋण अंशतः तरी फेडल्या-खेरीज माणसाला मुक्ति मिळत नाहीं म्हणतात. मग आपल्या राजासाठीं, राष्ट्रदेवासाठीं देह पडला तर तें भाग्य अलौकिक नव्हे का ? युवराजांच्यासाठीं मी तर क्षणाक्षणाचंहि मरण मोठ्या आनंदानं पत्करीन !

[ राजबहादुर व रंगराज पुढें येतात.

**राजबहादुर** : रंगराज, प्रतिज्ञेवर सांगतों, हा पुरुष नव्हे ! ही स्त्रीच आहे !

**रंगराज** : कशावरून ?

**राजबहादुर** : मी सांगतों म्हणून ! हो पुढं. एकदम चौकशीचा हल्ला चढव. सवालांची सरबत्ती उडव—प्रश्नांची फैर झडव—

**रंगराज** : ( संजीवनीस ) काय रे ? तूं कोण ? कुठला ? कुठं निघालास ? तुझं नांव-गांव ? ही बाई कोण ? बोल-बोल—

**संजीवनी** : ( तारिणीस ) ह्यांना आतां बोल बोल म्हणतां हुलकावणी दिली पाहिजे. देखतां डोळां विजेसारखी निसटून कृतांताच्या हातावर तुरी दिल्या. ती मी ह्यांची डाळ शिजूं देईन कीं काय ?

**रंगराज** : अरे शुंभा, बोल ना ? असा मुखस्तंभासारखा गप्प उभा कां ?

**संजीवनी** : ( रडक्या स्वरांत ) माझा उभा आधारस्तंभ ढांसळला म्हणून !

**राजबहादुर** : अरेरे ! असा कोणता डोंगर तुझ्या डोक्यावर कोसळला ?

**तारिणी** : चालू बंडाळीच्या धामधुमींत घरादाराचा धुव्वा उडाला !

**संजीवनी** : अन् असा वनवास आमच्या नशीबीं आला !

**रंगराज** : पण ही कोण तुझी ?

**संजीवनी** : माझी बहीण ! लग्न झालंय् हिचं पण हिचा नवरा म्हणजे शुद्ध जनावर आहे ! मोठा लोंचट, लुब्रा, लाळघोट्या ! वरिष्ठांच्यापुढं लांगूलचालन करून रोज नवे नवे अधिकार मिळवितो...

**तारिणी** : आज काय खुषमस्कऱ्या, उद्यां जमादार, परवां म्हणे गुप्त हेर... अधिकाराला बूडच नाहीं त्यांच्या...

**राजबहादुर** : काय म्हणतेस ? इरसाल गाढवच दिसतोय् तुझा नवरा !

**तारिणी** : त्यांचा चेहरामोहरा, रंग-रुबाब थेट तुमच्यासारखा !

**राजबहादुर** : ( रंगराजास ) बघ बेट्या ! झाली फिदा माझ्यावर ! ह्याला म्हणतात मर्द ! नाहींतर लेका तूं ! तोंडावरची माशी हालायची नाहीं ! मग बायका भाळायची गोष्टच कशाला ? ( तारिणीस ) पुढं सांगा तुमची गोष्ट—

**तारिणी** : बंडखोरांनीं पिच्छा पुरवलाय् आमचा !

**राजबहादुर** : त्यांनीं तर आपल्या पराक्रमाचं पाणी चांगलंच दाखवलं आहे.

**रंगराज** : अन् त्यामुळं प्रत्यक्ष महाराजांच्याहि तोंडचं पाणी पळालं आहे.

**संजीवनी** : महाराजांच्याकडे फिर्याद नेली पण फुकट! काय सांगूं बाबा!

**राजबहादुर** : रडूं नको बेटा! अरे, महाराजांच्या हातांत काय ढेंकळं आहेत! तो नांवाचा राजा! इंद्रजाल आणि कामिनीदेवी जसे नाचतील तसा तो नंदीबैल नाचणार! बरं पण, तुम्ही आतां निघालांत कोणीकडे?

**संजीवनी** : दुर्दैव नेईल तिकडे! ( तारिणीसह जाऊं लागते. )

**राजबहादुर** : थांबा, रात्रींची वेळ—बरोबर ही तरणीताठी पोर—आम्ही तुमच्याबरोबर येतों—

**संजीवनी** : कांहीं नको एवढी तसदी घ्यायला.

**रंगराज** : तसदी कसली ह्यांत? आम्ही त्या संजीवनीला पकडण्याच्या कामगिरीवर निघालोंच आहोंत—

**संजीवनी** : अस्सं! पण मी नेते हिला सांभाळून—

**रंगराज** : ने–ते? बायकी भाषा? राजबहादुर! हा पुरुष नव्हे! स्त्री आहे!

**राजबहादुर** : गधड्या, हें तर मी प्रथमच हेरलं होतं.

**तारिणी** : ( घाबरून ) ताईसाहेब, वेषांतराचा विसर पडून भलतंच बोलून गेलांत तुम्ही!

**राजबहादुर** : खात्रीनं संजीवनीच ही! अन् ती आमची ती! तारिणी!

**रंगराज** : भलतंच! तुम्हाला दिसेल ती स्त्री संजीवनीच वाटायला लागलेली दिसते! संजीवनी ह्यावेळीं इथं कशाला धडपडेल?

**राजबहादुर** : अरे, ती इतकी धूर्त, धोरणी आहे कीं कुठंही धडपडली तरी धडच पडेल! दुसऱ्याला मात्र तोंडघशी पाडील. अंधार पडला...नाहींतर चटकन् चेहरा पाहून...

**रंगराज** : मी करतों शहानिशा तोंड पाहून...( जवळ जाऊं लागतो )

**राजबहादुर** : ( मागें ओढून ) तोंड पाहणाराचं तोंड पाहा आधीं. चल, हो मागं. लागला लघळपणा करायला? अरे संभावित सोद्या! एखाद्या बाईच्या तोंडाला तोंड भिडवितांना तिची निदान तोंडओळख तरी हवी—

**रंगराज** : मग तुमची त्यांची ओळख आहे वाटतं?

**राजबहादुर** : अर्थात्! संजीवनीला मी ओळखतो. अन् माझ्या बायकोला तर चांगलाच ओळखून आहे! मी दाखवितों त्यांना हात...( जवळ जाऊं लागतो )

**रंगराज :** (मागें ओढून) अहो, पण एकदम असा बायामाणसांच्या अंगावर हात टाकणार ?

**राजबहादुर :** भितों कीं काय ?

**रंगराज :** पण हा काय सभ्यपणा ?

**राजबहादुर :** मी तुझा अधिकारी ! अन् तूं मला सभ्यपणा शिकवितोस ?

**तारिणी :** ताईसाहेब, लढूंदेत हे लांडगे आपापसांत ! एकदम पाय उचला पाहूं.

[ तारिणी व संजीवनी जातात. रंगराज व राजबहादुर आपसांत वाद घालीत असतांच इंद्रजाल, कामिनी व वज्रसार येतात.

**इंद्रजाल :** (वज्रसारास) समजलं ना ? शक्तीपेक्षां बेमालूम युक्तीनंच हें काम तडीला नेऊन...

**कामिनी :** त्या हडळीला एकदांची कायमची मुक्ति दिली पाहिजे—

**वज्रसार :** मी माझ्या कौशल्याची शिकस्त करतों—

[ मुजरा करून जातो. राजबहादुर धांवत येऊन एकदम इंद्रजालाला मिठी मारतो.

**राजबहादुर :** संजीवनी ! संजीवनीच ही !

[ रंगराज कामिनीला धरतो.

**रंगराज :** अहो, ती नव्हे ! ही पाहा संजीवनी !

**कामिनी :** मेल्या ! सोड-सोड मला...

**इंद्रजाल :** अरे बेवकूफ ! सोड-सोड...

**राजबहादुर :** खुशाल ओरडून प्राण सोड !

**कामिनी :** अरे, मी संजीवनी नव्हे...मला सोड-सोड...

**रंगराज :** वा रे भुलथापा गोड गोड ! काय तुझी आढ्यता ! जशी कांहीं आमची मिजासखोर कामिनीदेवीच !

**राजबहादुर :** (इंद्रजालास) वा ग तुझी मर्दानी ऐट ! जणुं इंद्रजालाचा बाप !

**इंद्रजाल :** अरे, तुम्हाला अरण्यांतल्या झोटिंगानीं झपाटलं कीं काय ?

**राजबहादुर :** रंगराज, कशी पकडली संजीवनीला !

**रंगराज :** अहो, संजीवनीला तर इकडे मी पकडली आहे ! तुम्ही तुमच्या बायकोलाच मिठी मारलेली दिसते...नाहींतर एखादी हडळ असेल ती—

**राजबहादुर** : ( न्याहाळून पाहून ) अरे बाप रे! हडळ नव्हे ब्रह्मसमंध! प्र-प्र-प्रधानजी! ( एकदम धाडकन् निचेष्ट पडतो. )

**रंगराज** : मग ही कोण बया ? (पाहून) अगाई ग! का–का–कामिनीदेवी!

**इंद्रजाल** : ( त्वेषानें ) शुद्धीवर आहांत का तुम्ही ? तूं कोण ? रंगराज!

**कामिनी** : अन् हा राजबहादुर! जिवंत जाळलं पाहिजे ह्यांना!

**रंगराज** : सरकार, माफ करा. संजीवनी पुरुषी वेषांतर करून आत्तांच इथं आली होती. पण तिनं आम्हांला चकवून पोबारा केला. इतक्यांत आपण आलांत...म्हणून हा सगळा घोटाळा झाला...

**इंद्राजाल** : नालायख! एका नाठाळ पोरीनं तुम्हाला चकविलं ?

**कामिनी** : धटिंगण मेले!

[ इंद्रजाल व कामिनी जातात. राजबहादुर हळूंच उठतो.

**रंगराज** : भले सद्गुरु! मला वाटलं, छाती हबकून मेलांत तुम्ही!

**राजबहादुर** : मेलोंच होतों! पुनर्जन्म झाला! बेशुद्ध पडल्याचं सोंग केलं...

**रंगराज** : म्हणूनच जिवंत राहिलांत!

**राजबहादुर** : पण ही खवीस–डांकिणीची जोडी ह्याच वेळीं इकडे कुठं मरायला आली ? ( जातात. )

## [ २ ]

कालकंदरीच्या अरण्यांतील राक्षसगुंफा. वज्रांग व संजय येतात.

**वज्रांग** : युवराज, कृतांताला त्याच्या भीषण भविष्याचा स्पष्ट इशारा छातीठोकपणें दिलांत! आपलं धाडस अलौकिक आहे.

**संजय** : पण संजीवनीचं साहस अधिक थोर आहे. तिनं जळजळीत शब्दांत कृतांताची कानउघाडणी तर केलीच पण त्याला सांगून सवरून धारिणीदेवींची मुक्तताहि केली. हो पण, ही कोणाची चाहूल ?

**वज्रांग** : हीच ती राक्षसगुंफा. शक्तिसिंहाचं गुप्त निवासस्थान. शक्तिसिंहच येत असावा...

[ गुहेंतून कांहीं सशस्त्र लोकांसह शक्तिसिंह येतो.

**शक्तिसिंह :** बोला, संजयमहाराज की जय !

[ सर्व लोक जयजयकार करतात.

**वज्रांग :** शक्तिसिंह, धन्य धन्य तुझ्या अलौकिक राजनिष्ठेची ! राज्यकर्त्यांची रावणशाही रसातळाला पोहोंचविण्याच्या इराद्यानं एक जरी वीरात्मा रोमरोमीं राष्ट्रभक्तीनं रसरसला तरी केवढं लोकोत्तर देशकार्य करूं शकतो, ह्याचं जिवंत उदाहरण म्हणजे उदंड हिमतीचा, निधड्या छातीचा हा शक्तिसिंह !

**संजय :** मीच काय पण साऱ्या देवावर्तानं वांकल्या मस्तकानं तुझी पूजा बांधावी एवढीच तुझी थोर योग्यता आहे. शक्तिसिंह !...

**शक्तिसिंह :** युवराज, आपल्या पायांच्या पुण्याईनं आम्ही कृतांताच्या सैतानशाहीचीं पाळंमुळं खणून काढूं !

**१ पुढारी :** युवराजांच्या हक्काचा लढा शेवटपर्यंत प्राणपणानं लढूं !

**शक्तिसिंह :** कृतांतानं–त्या बंडखोर बदमाषानं आम्हालाच बंडखोर ठरविलं आहे.

**२ रा पुढारी :** ठोशास ठोसा देऊन दुष्मन ठेचून टाकायला हवा !

**शक्तिसिंह :** न्यायाची चाड बाळगून हे लोक आपखुषीनं माझ्या मसलतींत सामील झाले आहेत.

**३ रा पुढारी :** तख्ताच्या सलामतसाठीं आम्हीं आमची जान–जिंदगी कुर्बान केली आहे !

**शक्तिसिंह :** कृतांताचं यमराज्य नाहींसं होऊन युवराजांचं रामराज्य देवावर्तांत अखंड नांदलं पाहिजे !

**वज्रांग :** तुमच्या शौर्याचं पाठबळ असल्यावर काय अशक्य आहे ?

**शक्तिसिंह :** युवराज, आपण आतां इथंच आमच्यांत राहावं. इथं धास्ती, धोका नाहीं–कसलीहि ददात नाहीं. शंभर कडवे जवान आपल्या दिमतीला देतों....

**वज्रांग :** युवराजांनीं कांहीं काळ हा अज्ञातवास पत्करणं श्रेयस्करच आहे.

**संजय :** पण आणखीहि एक महत्त्वाचं कार्य केलं पाहिजे. सरदार–मांडलिकांची सक्रिय सहानुभूति आपणाला मिळविली पाहिजे.

**वज्रांग** : अवश्यच आहे तें. अखिल देवावर्ताची प्रचंड संघटित प्रतिकारशक्ति एकदम उसळून उठेल तर कृतांताची जुलुमी सत्ता उलथून पाडायला घटकेचाहि अवधि लागणार नाहीं. सर्वांना गुप्त खलिते धाडले पाहिजेत.

**शक्तिसिंह** : मग ही कामगिरी माझ्यावर सोंपवा. चित्रगुप्ताच्या कुळींचे एकाहून एक चढत्या हिकमतीचीं माणसं माझ्या हातांशीं आहेत! ह्या कानाची वार्ता त्या कानाला कळणार नाहीं...आपल्या सहीशिक्क्याचे खलिते बिनबोभाट चहूंकडे रवाना होतील. कधीं लिहितां खलिते?

**वज्रांग** : आत्तांच त्या उद्योगाला लागलं पाहिजे.

[ सर्वजण संजयाचा जयजयकार करीत गुहेंत जातात. पुरुषवेषांत संजीवनी तारिणीसह येते.

**संजीवनी** : जयजयकार? युवराजांचा जयजयकार? जयजयकाराची मंगल गर्जना दशदिशांत जणुं सत्याचीच द्वाही फिरवीत आहे. युवराजांचं नांव कानीं पडलं कीं तारिणी, माझं मन कसं भारूनच जातं बघ. हो, पण पलीकडे ती अंधुक आकृति कोणाची? युवराजच तर नसतील ना?

**तारिणी** : (पाहून) तेच दिसताहेत! ताईसाहेब, आतां मात्र तुम्हांला माझ्या सोबतीची जरूरी नाहीं हो! तुम्ही जा म्हणायच्या आंतच ही पाहा, मी चाललें परत...

**संजीवनी** : थांब गडे, असं ग काय? अशा वेळीं तर मैत्रिणीची खरी जरूरी असते.

**तारिणी** : अहो, पण ते युवराजच असतील कशावरून?

**संजीवनी** : अग, चंद्राचं तेज का कधीं लोपून राहात असतं? युवराजच ते...चेहऱ्याची ओळख चटकन् पटली पण अंतःकरणाची ओळख...

**तारिणी** : म्हणजे?

**संजीवनी** : इतक्या दिवसांच्या हालअपेष्टानंतर त्यांचं हळवं मन पालटलं तर नसेल? आत्मतेजाचा जागृत झालेला ज्वालामुखी पुन्हां सुप्त व्हायचा... असंच सुंदर साहस केलं तर...(कानांत सांगते.) ह्या साहसाला हें वेषांतरहि सोयींचंच आहे...

**तारिणी** : कसलंहि साहस करा आतां...मी बाई आपली जाते...

[ चटकन् जाते.

**संजीवनी** : अग पण...गेलीच ही !

[ संजय येतो.

**संजय** : कोण आहेस तूं ?

**संजीवनी** : कृतांत महाराजांच्या पदरचा एक सरदार ! महाराजांचा एक महत्त्वाचा गुप्त संदेश युवराज संजयांना सांगण्यासाठीं...

**संजय** : ह्या संजयाला कृतांताचा संदेश ? तो कोणता ?

**संजीवनी** : चालू बंडाळी मोडून, अराजक लोकपक्षाला सोडून आपण सम्राटांचा पक्ष स्वीकारलांत तर...

**संजय** : तर काय ?

**संजीवनी** : श्रेष्ठ मांडलीकाचं थोर राजपद आपणला देण्याची सम्राटांची इच्छा आहे !

**संजय** : वा ! कृतांतानं औदार्य तर खूपच दाखविलं ! सिंहासन माझं... साम्राज्य माझं ! अन् कृतांत मला मांडलीकाचं राजपद देणार !

**संजीवनी** : म्हणजे आपणाला सम्राट्-पद हवं आहे ! साधं राजपद नको—

**संजय** : मला दोन्हीहि नको आहेत. माथ्यावर टीचभर रत्नजडित किरीट चढवून बाहुल्याप्रमाणं सिंहासनावर बसणं म्हणजेच राजा होणं काय ? कृतांता प्रमाणं नामधारी राजा होऊन साऱ्या महापातकांचा धनी होण्याची दुष्ट अमंगळ वासना ह्या संजयाच्या मनाला स्वप्नांतहि शिवणार नाहीं !

**संजीवनी** : दैव देतं नि कर्म नेतं, असं करूं नका. सम्राटांच्या इच्छेला मान द्या. जगांतलीं सारीं सुखं तुमच्या पायाशीं लोळण घेतील !

**संजय** : पुरे करा तुमची शिष्टाई ! सरदारसाहेब, अधिकार-वैभवाच्या क्षुद्र लालसेनं स्वतांच्या ध्येयाला, कर्तव्याला मूठमाती देणारा हा संजय नव्हे—

**संजीवनी** : पण क्षणोक्षणींच्या आपत्तींनीं वेढलेलं असं निराश्रित जिणं—

**संजय** : स्वदेशासाठीं फकीरी स्वीकारणाऱ्या राष्ट्रसेवकाला सुखाचंच वाटतं.

**संजीवनी** : पण सम्राटांच्या सत्ता-सामर्थ्याचा जरा विचार करा...

**संजय** : सम्राटांच्या सामर्थ्यापेक्षां जनतेचं सामर्थ्य अनंतपटीनं थोर आहे.

**संजीवनी** : देवावर्ताच्या नशीबाची नाडी सम्राटांच्याच केवळ इच्छालहरीं-तून वाहात आहे. देवावर्ताचं दैव त्यांच्या नजरेच्या तालावर नाचत आहे—

**संजय** : पण देवावर्ताच्या उसळत्या राष्ट्रतेजोरसाचा एकेक बिंदु म्हणजे दैवी सामर्थ्याचा सिंधु आहे! त्या सामर्थ्यानं संपन्न झालेला प्रत्येक राष्ट्रवीर सम्राटांचाहि सम्राट् आहे!

**संजीवनी** : आपल्या दृष्टीनं हें सगळं तत्त्वज्ञान ठीक आहे. पण आपली वाग्दत्त वधू संजीवनी......

**संजय** : ती तर माझ्या देशसेवेची स्फूर्ति आहे.

**संजीवनी** : पण तत्त्वनिष्ठ, विरक्त पतीच्या रुक्ष सहवासांत असं भणंग बैराग्यासारखं कष्टमय जिणं कंठणं कोणत्याहि स्त्रीला सुखाचं वाटेल का?

**संजय** : म्हणजे? त्यागी विरागी वृत्तीची माझी संजीवनी, वैभवाच्या मापानं मोजल्या जाणाऱ्या हिणकस प्रेमाची नटवी पुतळी समजलांत कीं काय तुम्ही?

**संजीवनी** : आपणाला स्त्रीहृदयाची नीटशी पारख नाहीं, असंच मोठ्या खेदानं म्हणावं लागतं.

**संजय** : सर्वसामान्य स्त्रीहृदयाची नसली तरी संजीवनीच्या हृदयाची ओळख मला पूर्ण आहे.

**संजीवनी** : मग सामोपचाराचा सलोखा घडवून आणायला ती कृतांत-महाराजांच्याकडं...

**संजय** : काय? ह्यासाठीं ती कृतांताकडे गेली होतो? अगदीं खोटं!

**संजीवनी** : अगदीं खरं आहे हें. महाराजांना तिची दया आली...

**संजय** : दया? दयामाया हा शब्द तरी कृतांताला ठाऊक आहे का? सरदारसाहेब! हें सारं कृतांताचंच कारस्थान आहे; माझी खात्रीच झाली' संजीवनीचं नांव कपटानं पुढं करून...

**संजीवनी** : पण हा निरोप खुद्द संजीवनीच्याच तोंडून आपणाला कळला असता तर—

**संजय** : तर निरोपाच्या पहिल्याच शब्दाबरोबर तिचाहि शेवट झाला असता!

**संजीवनी** : (वेष बदलून) मग ही पाहा, संजीवनीच आपल्या पुढं उभी—

**संजय** : कोण? संजीवनी? वैरिणी! वैभवाला लालचावून माझी वाग्दत्त वधु म्हणून मिरवितेस? सम्राज्ञीचे सुखसोहाळे उपभोगण्याच्या उद्देशानंच...

**संजीवनी** : (हंसून) नाहीं! नाथ, ह्या संजीवनीच्या हृदयानं स्त्रीसहज

चंचलता स्वीकारलेली नाहीं. पण केवळ आपल्या अंतःकरणाची परीक्षा पाहावी म्हणूनच...

**संजय :** ( हंसून ) समजलों. पण हा वरपरीक्षेचा नाटकी प्रवेश फारच बहारीनं रंगविलास तूं !

**संजीवनी :** आपल्या सात्विक संतापाच्या चढत्या लाटेसरशीं माझ्या आनंदाला अखंड भरतीच येत होती. ह्या दासीला क्षमा करायची हं !

**संजय :** क्षमा ? शक्यच नाहीं. अपराध्याला शासन झालंच पाहिजे. तुला बळकट बाहुपाशांनीं बांधून...

**संजीवनी :** ( लाजून ) इश्श ! वर त्या चंद्राकडे पाहा जरा !

**संजय :** तें कां ? ही चंद्रमुखी जवळ असतांना त्या चंद्रमुखाकडे डोळे लावण्याइतका मी अरसिक नाहीं. तूंच बघ जरा. तुझा मुखचंद्र पाहून तो बिचारा चंद्र कसा ओशाळून गोरामोरा झाला आहे !

**संजीवनी :** विश्वकल्याणासाठीं गगनगिरीवर महान् तप आचरणारा हा महामुनि–दशदिशांत शांतिसुखामृताचं अभिसिंचन करीत दिव्यप्रेमाचा स्वर्गीय संदेश सांगणारा हा महात्मा–हा चंद्रमा आपल्या विकारी प्रेमाला हंसतो आहे !

**संजय :** खरं आहे. म्हणूनच म्हणतों, मला एकवार असं गाढ आलिंगन दे कीं, देहांच्या मिठीबरोबरच जीवांचीहि मिठी बसून दिव्य प्रीतीनं रसरसलेल्या तुझ्या हृदयाशीं माझं विकारवश हृदय एकरूप होऊन त्यांत भिन्न विचार–विकारांना वावच राहणार नाहीं. ये—ये—

[ इतक्यांत—' दगा–दगा–सावध राहा हो ! कृतांताच्या लोकांनीं काल-कंदरीला चौफेर वेढा दिला—सावध राहा हो ! '—अशी दवंडी ऐकूं येते.

**संजय :** काय ? शत्रूनं असा रात्रींचा चोरटा छापा घातला ? संजीवनी, तुझ्या गाढ आलिंगनासाठीं आतुरलेले हे संजयाचे वीर बाहु आतां शत्रूला कंठस्नान घालण्यांतच गुंतले पाहिजेत !

[ वज्रांग येतो.

**वज्रांग :** युवराज, दगा–दगा ! शत्रू तोंडाशीं येऊन भिडला ! आपला ठाव-ठिकाणा कृतांताला लागला.

**संजय :** तुम्ही आणि शक्तिसिंह आश्रयाला आलेल्या लोकांच्या संरक्षणाची काळजी घ्या. कर्तव्याची हांक कानांवर आली. मी चाललों...( एकदम जातो. )

**वज्रांग** : गेलेच हे—

**संजीवनी** : बाबा, तुम्हीहि त्यांच्या पाठोपाठ जा—

**वज्रांग** : पण तूं इथं एकटीच...

**संजीवनी** : माझी चिंता करूं नका...

**वज्रांग** : पण चौफेर पेटलेल्या वणव्यांत निष्काळजीपणानं हें जिवाचं फूल कसं फेंकून देऊं?...युवराज थोडे थांबले असते तर...विलक्षणच पेचप्रसंग...

**संजीवनी** : माझ्यांत जीव गुंतवूं नका. आधीं युवराजांच्या रक्षणासाठीं—

**वज्रांग** : हा चाललोंच-पण मला एकदां अखेरची मिठी—

**संजीवनी** : अखेरची मिठी ? असं कां बरं बोलतां बाबा ?

**वज्रांग** : भविष्यकाळ विश्वासघातकी आहे म्हणून ! वज्रांगाच्या विरक्त मनालाहि अपत्य-स्नेहाचा संन्यास अशा अघोर प्रसंगीं घेववत नाहीं ग बाळे !

[संजीवनीला पोटाशीं कुरवाळतो तोंच एक शिपाई येऊन मध्यें तरवार रोखतो.

**शिपाई** : थाबा ! तुम्हाला कडकडून भेटून तुमच्या राजद्रोही रक्ताचं चुंबन घ्यायला ही माझी उतावीळ समशेरच धांवून आली आहे पाहा !

**वज्रांग** : दूर हो नादान ! तुझ्यासारख्या शेंपन्नास शेळपटांना हा एकटा वज्रांग भारी आहे !

[ चकमक उडते. शिपाई मरतो. इंद्रजाल व वज्रसार एकीकडे बोलत येतात.

**इंद्रजाल** : ( संजीवनीकडे पाहात ) वज्रसार, सांगितल्याप्रमाणें कामगिरी पार पाडायची—

**वज्रसार** : कसूर होईल तर शपथ ह्याच पायाची !

[ दोघे जातात. कांहीं सशस्त्र शिपायांसह समोरून चंडपाल येतो.

**चंडपाल** : मर्दांनों ! चला, एकदम तुटून पडा ह्या बंडखोरांवर !

[ तोंच वज्रसार येतो.

**वज्रसार** : चंडपाल! थांब! ह्या सेनापतीच्या डोळ्यांदेखत हा अत्याचार ? प्रत्यक्ष त्याच्या बंधूवर नि पुतणीवर तरवारीचा वार ? पागल !

[ चंडपाल, वज्रांग वगैरे सर्वच विस्मयचकित होतात.

**वज्रांग** : वज्रसार, तुझ्याच तोंडचे का हे शब्द ?

**वज्रसार** : होय. चाकरीला देह विकला गेला तरी माझं मन स्वतंत्रच आहे.

क्षमा करा. . .दादासाहेब ! आजवरच्या अपराधांची मला मनापासून क्षमा करा.

**वज्रांग :** वज्रसार, तुझं मन खरोखरीच पश्चात्तापानं पोळत असेल तर तुला क्षमाच काय, हा वज्रांग तुझ्यावरून आपल्या पंचप्राणांचीहि कुरवंडी करील! ( त्याला कुर्वाळतो ). . .पण फार बरं झालं. . .देवानंच तुला ह्यावेळीं इकडे धाडलं. मला युवराजांच्याकडे गेलं पाहिजे. हा माझ्या काळजाचा तुकडा मी विश्वासानं तुझ्या स्वाधीन करतों—

**वज्रसार :** बेशक ! आधीं माझा मुडदा पडेल अन् मगच संजीवनीच्या केंसाला धक्का लागेल !

**वज्रांग :** जातों तर मी. संजीवनी—

**संजीवनी :** मीहि तुमच्याबरोबर येतें—इथं राहात नाहीं—

**वज्रांग :** इथंच थांब तूं. ऐनवेळीं अशी पायखेची करूं नकोस—( जातो. )

**वज्रसार :** ( शिपायांस ) वज्रांगाचा पाठलाग करून त्याला कैद करा—

**संजीवनी :** म्हणजे ? ह्याचा काय अर्थ ?

**वज्रसार :** ह्याचा अर्थ कृतीनंच स्पष्ट करतों पाहा ! चंडपाल !. . .

**संजीवनी :** काका—काका ! पण छे ! रक्ताच्या नात्याचं आतां नांव तरी कशाला ? चांडाळा ! तुझे मानभावीपणाचे मायाळू शब्द अजून ह्या वातावरणांत पुरते विरलेहि नाहींत तोंच आपलं सैतानी स्वरूप तूं प्रकट केलंस ?

**वज्रसार :** ( हांसून ) माझा कपटी व्यूह तूं आत्तां ओळखलास ? वेडे पोरी !

**संजीवनी :** राक्षसा ! भोळ्या बुद्धीनं मांडीवर टेकलेली मान अशी विश्वासघातानं कांपतोस ? परमेश्वरापुढं काय जाब देशील ह्या पापांचा ?

**वज्रसार :** मला स्वर्गांतल्या परमेश्वराची डर नाहीं. पण ह्या पृथ्वीवरल्या परमेश्वराची, माझ्या वरिष्ठांच्या खुषीची मला कदर आहे. हे परमेश्वर प्रसन्न झाले तर स्वर्ग माझ्या मुठींत येईल, असं माझी राजनिष्ठा मला सांगत आहे—

**संजीवनी :** राजनिष्ठा ? ही तुझी राजनिष्ठा नसून टीचभर पोटाची खळगी भरण्यासाठीं स्वीकारलेली श्वानवृत्ति आहे ! तुम्ही राजनिष्ठ ? घरभेदे कुलांगार, मात्रागमनी तुम्ही ! देशाचे काळ झालेले कुऱ्हाडीचे दांडे ! स्वार्थासाठीं माणुसकीला जाळणारे अस्तनींतले निखारे तुम्ही—

**वज्रसार :** पोरटे, वावदूक शब्दांची उधळण पुरे कर ! चंडपाल ! ह्या बेफाम पोरीच्या शरीराचे राईराई एवढे तुकडे उडव. . .चल, हो पुढं—

**चंडपाल** : सेनापतिसाहेब ! ह्या चंडपालाची ही समशेर शेंकडों जवानांचे गळे धडावेगळे करील ! पण एका अनाथ अबलेवर हत्यार चालवायचं ? थूः त्या नामर्दाच्या जिनगानीवर !

**वज्रसार** : काय ? सेनापतीचा हुकूम मानीत नाहींस ?

**चंडपाल** : सारी जिंदगी स्वतःच्या रक्तांत बुडवूं ! पण असला हलकट हुकूम सेनापतीचाच काय, प्रत्यक्ष राजाचा असला तरी अस्सा पायाखालींच तुडवूं !

**वज्रसार** : ही मग्रूरी ? तुम्हाला सम्राटांचं भय वाटत नाहीं ?

**चंडपाल** : सम्राटांचं भय तुम्हांला ! त्या ब्रम्हांडाच्या बादशहाचं—देवाचं भय आम्हाला ! चला रे मर्दांनों !

**वज्रसार** : चाललांत कुठं ? तुमचाहि शेवट करतों. पण आधीं—रंगराज !

[ रंगराज येतो.

**रंगराज** : आज्ञा महाराज !

**वज्रसार** : माझा हुकूम तूं मानशील ?

**रंगराज** : हा काय प्रश्न ? आपली आज्ञा मोडण्याची कोणाची प्राज्ञा आहे?

**वज्रसार** : मग उपस समशेर अन् छाटून टाक ह्या पोरटीचं मुंडकं !

**रंगराज** : कोण ? संजीवनी ? सेनापतिसाहेब, ह्या देवतेऐवजीं माझाच बळी मी आपणाला देतों...पण—

**वज्रसार** : पण काय ? बेमान !

**रंगराज** : एका स्त्रीवर शस्त्र चालविणं नामर्दाचं काम आहे. माझं नव्हे—

[ तरवार फेकून देतो.

**संजीवनी** : पाहा—पाहा ! ह्या तुझ्याच हाताखालच्या माणसांत केवढी माणुसकी आहे !

**वज्रसार** : हा पाहा त्या मुर्दाड माणुसकीचा मोबदला !

[ पाठीमागून अचानक रंगराजाला कट्यारीचा वार करतो. रंगराज घायाळ होऊन पडतो.

**संजीवनी** : अरेरे ! चांडाळा, काय केलंस हें ? ( रंगराजाजवळ जाते. )

**रंगराज** : ( संजीवनीच्या पायांवर डोकें टेकून ) देवते, तुझ्यापायीं मरण लाभलं, स्वर्ग लाभला ! उभी हयात सैतानांच्या चाकरींत राबवली...पण आज अखेर

साधली...मी चाललों पण वज्रसार, लक्ष्यांत ठेव! ह्या पापाचं माप तुला हातोहात मोजावं लागेल...देवा–देवा!...(प्राण सोडतो.)

**संजीवनी** : ह्या निष्पाप जीवाचा अंतकाळचा शाप ऐकलास ना? देवाचा न्याय निष्ठुर आहे!

**वज्रसार** : देवाचा न्याय राहिला दूर! हा पाहा, माझा न्याय!—

[ तरवार उगारून संजीवनीच्या अंगावर धांवतो. तोंच इंद्रजाल व राजबहादुर येतात.

**इंद्रजाल** : थांब–थांब! हें काय करतोस?

**वज्रसार** : आपल्या हुकुमाची अंमलबजावणी!

**इंद्रजाल** : माझा हुकूम संजीवनीला गिरफदार करण्याचा होता. तिला ठार मारण्याचा नव्हता.

**वज्रसार** : होय. पण आपल्या मेहेरबानीच्या आशेनंच—

**इंद्रजाल** : अन् हा कोण? रंगराज! तूं ह्याचा खून केलास?

**राजबहादुर** : अरेरे! फुकट मेला बिचारा! (जवळ जाऊन रंगराजाच्या प्रेताला 'हुश्श' म्हणत टेंकून बसतो.) बेटा, सुखानं स्वर्गाला जा बरं! मरण तरी एकेकाला किती चमत्कारिक रीतीनं येतं बघा!

**इंद्रजाल** : राजबहादुर, तिकडे काय करतोस?

**राजबहादुर** : हुजूर! रंगराजाला बजावतोंय् कीं गाढवा! पुढच्या जन्मीं तरी असा गाढवपणा करूं नकोस. राजनिष्ठ हो! राजनिष्ठ हो!!

**इंद्रजाल** : ह्या माझ्या रखेलीला मोठ्या बंदोबस्तानं घेऊन जा अन् माझ्या वाड्यांतल्या तळघरांत कोंडून ठेव!

**संजीवनी** : सैताना! विस्तावाशीं खेळूं नकोस—मरणाला कवटाळूं नकोस!

**इंद्रजाल** : (राजबहादुरास) घेऊन चल हिला. अंधारकोठडींत डांबल्याखेरीज हिच्या टाळक्यांत लख्ख प्रकाश पडणार नाहीं.

**वज्रसार** : प्रधानजी, ही कामगिरी मी कसोशीनं पार पाडतों—

**इंद्रजाल** : तूं थांब. राजबहादुर, बंदोबस्तांत कसूर होईल तर गर्दन उडेल.

**संजीवनी** : (वज्रसारास) नराधमा! पुतणी म्हणजे प्रत्यक्ष लेकीसारखी! तिचा विश्वासघात करून जातिवंताच्या वीरकुळाला लांछन किं रे लावलंस!

[ सशस्त्र शिपायांच्या पाहाऱ्यांत राजबहादुर संजीवनीला घेऊन जातो.

**इंद्रजाल** : ( मोठ्यांदा हांसून ) वज्रसार, मी बेहद्द खूष आहे तुझ्यावर !

**वज्रसार** : प्रधानजींची मेहेरबानगी आहे ह्या स्वामिनिष्ठ सेवकावर !

**इंद्रजाल** : तुझ्या स्वामिनिष्ठेचं बक्षीस म्हणून मी तुला स्वर्गाचं साम्राज्य बहाल करणार आहे ! चल, स्वर्गारोहणाची तयारी कर—

**वज्रसार** : म्हणजे ?

**इंद्रजाल** : ( त्याची तरवार हिसकावून घेऊन ) मरायला तयार हो !

**वज्रसार** : माझा गळा नि माझीच सुरी ! प्रधानजी, हा कुठला न्याय ?

**इंद्रजाल** : हा आम्हां राज्यकर्त्यांचा न्याय ! भल्या माणसा, प्रत्यक्ष आपल्या वडील बंधूचा गळा ज्यानं विश्वासघातानं कांपला तो निमकहराम उद्यां आमच्यावर उलटून आमच्याशींहि दगाबाजी कशावरून करणार नाहीं ? तुझ्यासारखे घरभेदे कुलांगार प्रथम ठार केले पाहिजेत.

**वज्रसार** : अरेरे ! प्रामाणिक स्वामिनिष्ठेची ह्या जगांत—

**इंद्रजाल** : हीच किंमत !

[ वज्रसाराला वार करतो. चंडपालादि शिपाई हळूंच येऊन तें पाहतात.

**चंडपाल** : ( एकीकडे ) अरे, ह्या हैवानानं तर सेनापतींचा खून पाडला !

**वज्रसार** : अधमा ! हें तुझं काळं कृत्य कृतांताला कळलं तर—

**इंद्रजाल** : महामूर्खा, तुझ्या रक्तानं माखलेली ही तरवार एक दिवस कृतांताच्याहि गळ्यावरून फिरणार आहे. समजलास ? खुशामती कंगाला, आजन्म कुत्र्याप्रमाणं माझे पाय चाटलेस ! कुत्र्याच्याच मरणानं मर जा—

[ लाथ मारून हांसत हांसत निघून जातो. चंडपाल वगैरे पुढें येतात.

**चंडपाल** : हसा–हसा ! प्रधानजी, पोटभर हांसून घ्या–तुमच्या गुप्त खुनाला वाचा फोडून तुम्हाला धाई धाई रडवायला आम्ही जिवंत आहोंत—! सेनापतिसाहेब ! पापानंच पापाला गिळून टाकलं !

[ चंडपाल शिपायांसह जातो. तोंच वज्रांग येतो.

**वज्रांग** : ( पाहून ) हें काय ? वज्रसार घायाळ ?

**वज्रसार** : मी चाललों...! दादासाहेब, क्षमा करा...

**वज्रांग** : संजीवनी कुठं आहे ?

**वज्रसार** : इंद्रजालाच्या वाड्यांत...तळघरांत ! संजीवनी क्षमा कर...देवा !

[ वज्रसार मरतो.

## [ ३ ]

रस्ता–भीमरुद्राच्या किल्ल्याचा पायथा. संजय व शक्तिसिंह येतात.

**संजय** : ह्या भीमरुद्राच्या किल्ल्यांत–अंधार कोटडींत धारिणीदेवींना पुन्हां ठेवलंय् म्हणतोस ? हा तट तरी किती अभेद्य, अजस्र आहे !

**शक्तिसिंह** : पण असले कोट किल्ल्यांचे मजबूत तट हा शक्तिसिंह एकटा उलथून जमीनदोस्त करील ! हा चढलोंच बघा तटावर !

**संजय** : थांब ! ह्या प्रसंगीं शक्तीपेक्षां युक्तीचीच योजना योग्य आहे. अशा अधीरपणानं व्यर्थ कार्यहानि मात्र व्हायची. ती पाहा, शिपायांची टोळी इकडंच येत आहे...सावध !

[ चंडपाल कांही शिपायांसह येतो.

**चंडपाल** : सरकार, सरकार ! आश्रयाच्या आशेनं ह्या चंडपालानं आपल्या पायांकडे धांव घेतली आहे. इंद्रजालानं सेनापति वज्रसारांचा गुप्त वध केला. त्यामुळं बहुतेक सैनिक बिथरले असून सैन्यांत दुफळी माजली आहे—

**संजय** : वज्रसाराचा इंद्रजालानं खून केला ?

**शक्तिसिंह** : कांट्यानं कांटा गेला !

**चंडपाल** : पण त्या खुनाचा आरोप आपल्या लोकांवर लादण्यांत आहे !

**संजय** : आमच्यावर ?

**चंडपाल** : होय सरकार ! तो अन्याय बघवेना म्हणून तर नोकरीवर–घरादारावर लाथ मारून इकडे आलों. आजपासून आम्ही ह्या पायांचे चाकर आहोंत—

**शक्तिसिंह** : पण ह्यांत दगा-फटका, फंद-फितुरी—

**चंडपाल** : बिलकूल नाहीं. आम्ही सिध्या बाण्याचे, खुल्या दिलाचे शिपाई गडी ! दिल्या बोलांत तफावत होईल तर आपल्या हातांनीं आपली गर्दन

उतरून देऊं. एकदां आम्हाला आपलं म्हणून जवळ करा कीं मग कुणी कांपलं तरी आम्ही दूर होणार नाहीं ! चाकरीशीं चोर ठरणार नाहीं !

**संजय** : चंडपाल, तुझ्यासारखे राजनिष्ठ जीवच देवावर्ताच्या दौलतीचे खांब आहेत ! निसर्गाची शक्तीच साह्यकारी असते हेंच खरं. अशाच रीतीनं सारं सैन्य फितूरलं, प्रजेनं बंड उभारलं, तर कृतांताच्या पाशवी सम्राट्-सत्तेचं राक्षसी थैमान कुठवर चालणार ?

[ वज्रांग येतो.

**वज्रांग** : युवराज, युवराज, अनर्थ झाला ! वज्रसाराचा ग्रून पाडून इंद्र-जालानं संजीवनीला आपल्या वाड्यांतल्या तळघरांत कोंडून ठेवलं आहे—

**संजय** : काय सांगतां हें ? चहुंकडून संकटांचा अग्निवर्षाव करीतच दुर्दैवानं आमच्याशीं झुंज आरंभलेली दिसते—

**वज्रांत** : पण संकटांच्याच सहाणेवर धैर्याला धीर देऊन प्राप्त परिस्थितीचा पाश कांपून काढला पाहिजे.

**शक्तिसिंह** : विचाराची वेळ नाहीं. आपण आणि वज्रांग संजीवनीताई-साहेबांच्या सुटकेसाठीं धांवा...मी ह्या चंडपालाच्या मदतीनं किल्ल्यांत घुसून आईसाहेबांच्या सुटकेच्या तजविजीला लागतो—

**चंडपाल** : सरकार, आपण अगदीं बेफिकीर असा. ह्या किल्ल्याच्या कोना-कोपऱ्यांत वावरलेली आम्ही माणसं. इथल्या सगळ्या चोरवाटा आम्हांला ठाऊक-

**वज्रांग** : ठीक आहे. तर मग लागा उद्योगाला—चला, युवराज !

[ सर्वजण जातात.

## [ ४ ]

भीमरुद्राच्या किल्ल्यांतील अंधार-कोठडीत धारिणी देवी. तारिणी जेवणाचें ताट घेऊन येते.

**तारिणी** : आईसाहेब, दैवानं काय हो आपली अघोर दुर्दशा मांडली हीं !

**धारिणी** : ही सत्व-परीक्षा आहे. पण तूं कां उगीच वाईट वाटून घेतेस ?

**तारिणी** : महाराणीच्या ऐश्वर्यांत लोळणारी माउली—

**धारिणी :** आज अशी मातींत लोळत आहे ! पण उपाय काय ? मनाला मारण्याची कला पुरुषांप्रमाणं स्त्रियांना साधत नाहीं ग !

**तारिणी :** पण दोन दिवस झाले...अन्नाचा कण कीं पाण्याचा घोट आपण तोंडांत घेतला नाहीं. प्राण कसे डोळ्यांत आलेत...

**धारिणी :** तेच प्राण ह्या देहाला कधीं सोडून जातील, असं झालंय् मला—

**तारिणी :** तें कांहीं नाहीं. आज माझ्यासाठीं तरी दोन घांस—

[ इतक्यांत कामिनी येते.

**कामिनी :** तारिणी, हिला इथं घांस भरवीत बसलीस वाटतं ? ( अन्नाचे ताट लाथाडून ) चल, हो दूर. आजपासून हिला अन्न-पाणी बंद ! हिनं भुकेनं टाचा घांसूनच प्राण सोडले पाहिजेत. ( धारिणीजवळ जाऊन ) कसं काय राणी-सरकार ! हे साखळदंडाचे अलंकार नाजूक हातापायांना छान शोभतात नाहीं ! सार्वभौम कृतांतरायाची तूं पट्टराणी ! सम्राज्ञी !...

**धारिणी :** मी सम्राज्ञी नसून एका निष्ठुर दरोडेखोराची धर्मपत्नी...

**तारिणी :** प्रत्यक्ष पतीला उद्देशून हे शब्द ! अजूनहि पीळ कायमच ॲ ! वहिनी, तुझी मला दया येते ग ! नवऱ्याच्या मर्जीनं वागून गजांतवैभवांत नांदण्याचं सोडलंस अन् हें पाप आपल्या हातांनीं कशाला बरं जवळ ओढलंस ? कपाळकरंटे, कुमाराच्या राज्याभिषेकाला नुसत्या शब्दांनीं संमति दे—निदान त्या बाबतींत तोंड तरी मिटून घे—

**धारिणी :** शक्य नाहीं. तोंडांत जीभ असेपर्यंत—

**कामिनी :** फाजील जीभ कांपून बेताची केली जाईल—

**धारिणी :** तरीदिखील नुसत्या कंठाक्रोशानं ब्रह्मांडाला जागं करून—

**कामिनी :** पण अशा हटवादीपणानं तुझ्या गळ्याभोंतींचा यमयातनांचा फांस मात्र घट्ट आवळून बसेल. न्यायनीतीच्या खुळ्या कल्पनेनं प्रत्यक्ष पोटच्या पोराच्या भाग्यावर निखारे ठेवतेस ?

**धारिणी :** नुसत्या भाग्यावरच काय पण प्रसंगीं त्याच्या प्राणांवरहि आग ओतीन ! सत्वपालनासाठीं कोणतंहि भयंकर दिव्य मी आनंदानं करीन !

**कामिनी :** सत्वाची चांगुणाच तूं ! तुझं सत्व मला शेवटपर्यंत पाहायचं आहे.

**धारिणी :** माझं सत्व तूं काय पाहतेस ? तो परमेश्वर पाहातोय् !

**कामिनी :** आधीं संजयाचा मुकुट धनंजयाच्या डोक्यावर चढलेला तुला दाखवितें अन् मगच...

**धारिणी :** पण माझा चिमणा चिलया—माझा धनंजय तो मुकुट आपल्या मस्तकावर मुळींच चढवून घेणार नाहीं !

[ धनंजय धांवत येऊन धारिणीच्या कमरेला मिठी मारतो.

**धनंजय :** नाहीं—कधींच नाहीं! आई, हा तुझा लाडका धनंजय त्या मुकुटाकडे ढुंकूनसुद्धां बघणार नाहीं!

**धारिणी :** सत्वाला जागलास तर देव तुला ध्रुवबाळाचं अढळपद देइल !

**धनंजय :** पण आई, बाबा राक्षस आहेत का ग ? प्रल्हादाप्रमाणं मीसुद्धां दैत्यकुळांत जन्मलों का ग ?

**धारिणी :** चुप् ! असं बोलूं नये बाळ—

**कामिनी :** खाण तशी माती ! धनंजय, बापाला दैत्य म्हणतोस ? तुला कांहीं काळीज ?

**धनंजय :** हा प्रश्न तूं स्वतालाच विचार...आत्याबाई ! आगीची खाई !

**कामिनी :** अगोबाई ! ह्या कार्ट्यानंहि मर्यादा सोडली. इकडे कां उलथलास?

**धनंजय :** मी माझ्या आईला भेटायला आलोंय्—

**कामिनी :** खबरदार पुन्हां इकडे पाऊल टाकशील तर ! चल येथून—

**धारिणी :** जा बाळ. आतां माझा भरंवसा धरूं नकोस. माझ्या ठिकाणीं तुला संजीवनीच—

**कामिनी :** संजीवनी पडली आहे इंद्रजालाच्या कैदेंत !

**धारिणी :** ( सखेद आश्चर्यानें ) इंद्रजालाच्या कैदेंत ?

**धनंजय :** आई, मी आणतों ताईसाहेबांना सोडवून—

**कामिनी :** पण तूं माझ्या तावडींतून सुटशील तेव्हां ना ? पराक्रम बघा बाळाचा ! आधीं जेव चल—पंचपक्वान्नावर आडवा उभा हात मार म्हणजे जरा जोर तरी येईल. चल जेवायला—

**धनंजय :** मी येणार नाहीं. माझी आई इथं शिळ्या तुकड्याला मोताद झालेली ! अन् मी तिकडे ताज्या पक्वान्नावर ताव मारूं म्हणतेस ! आई उपाशी तडफडत असतांना तिच्या मुलांनीं मिष्टान्नांची मेजवानी झोडणं म्हणजे नरकाचे घांस गिळणं आहे !

**धारिणी** : ( कुर्वाळून ) बाळ, बाळ, कसे रे हे अमृताचे बोल बोलतोस? द्रिष्ट लागेल माझ्या बाळाला—

**धनंजय** : आई, हे अमृताचे बोल माझे नव्हेत. तुझेच आहेत. तुझ्या मुखांत अमृत आहे. तूं अमृताची गंगा आहेस. आई, लहानपणीं मांडीवर घेऊन तूं मला दूध पाजलंस—

**धारिणी** : हो पण तुझ्या कोवळ्या ओठावरचं अमृत आतां मला पिवूंदे...

[ उराशी कुर्वाळून धनंजयाचे मटामट मुके घेऊं लागते. कामिनी त्याला बाजूला ओढते.

**कामिनी** : चल, ये इकडे! पुरे झाले हे चुंबनाचे चोंचले! तुझा एकदां राज्याभिषेक झाला म्हणजे—

**धनंजय** : माझा राज्याभिषेक आत्तांच झाला! हा पाहा, माझ्या मस्तकावर आईच्या अश्रूंचा अभिषेक!

**कामिनी** : लहान तोंडीं मोठा घांस घेऊं नकोस. चल मुकाट्यानं—

**धनंजय** : येणार नाहीं! मी इथंच आईजवळ राहणार आहे—

**कामिनी** : इथं काय गाठोडं पुरलंय् तुझं? इथं फुलांच्या पायघड्या पसरल्या नसून रक्ताचा रुजामा अंथरला आहे. समजलास? चल, सोड तिला—

**धारिणी** : अशी गाय-वांसराची ताटातूट करूं नकोस ग! बाळ-बाळ—

**धनंजय** : आई-आई—

[ असें ओरडत असतांच कामिनी त्याला फरफटत ओढून नेते.

**तारिणी** : पूर्वजन्मींची दावेदारीण ह्या जन्मीं नणंद होऊन छळते आहे—

**धारिणी** : पण हिनं संजीवनीचंदिखील वैर साधलं ग!

**तारिणी** : आईसाहेब, काळजी करूं नका. त्या लांडग्याच्या पकडींतून मी सोडवून आणते ताईसाहेबांना!

**धारिणी** : ( आश्चर्यानें ) तूं-तूं?

**तारिणी** : हो-हो-मी! ( हळूंच कानांशी पुटपुटून ) अशी युक्ति योजतें—

**धारिणी** : धन्य आहे तुझ्या चतुर साहसी बुद्धीची!

**तारिणी** : आईसाहेब, हातून सत्कार्य घडलं तरच मानव-जन्माचं सार्थक! आम्ही गरीब माणसं!-अगबाई, पण महाराजच इकडे आले, जाते मी-

[ लगबगीनें जाते. कृतांत दीन मुद्रेनें येतो.

**कृतांत** : धारिणी, हा महापातकी कृतांत– ( जवळ जाऊं लागतो. )

**धारिणी** : दूर व्हा ! राज्यलोभी सम्राट् कीं प्रेमळ पति—कोणत्या नात्यानं तुम्ही माझ्यापुढं उभे आहांत, तें प्रथम सांगा नि मगच पुढं पाऊल टाका !

**कृतांत** : धारिणी, संजय–संजीवनीच्या वाक्प्रहारांनीं आधींच विदीर्ण झालेल्या माझ्या हृदयावर तूं आणखी असे वाग्बाण सोडूं नकोस. ( आवेगानें ) देवते, देवते, मला क्षमा कर–( पाय धरूं लागतो. )

**धारिणी** : हां–हां ! हें काय ? धर्मपत्नीच्या नात्यानं मीच आपली चरणधूलि शिरीं धारण करते पण तुमच्या जुलूमशाहीशीं झगडणाऱ्या एका पतिव्रतेच्या कठोर जबाबदारीनं—

**कृतांत** : मला दूर लोटूं नकोस. मला खरोखरीच पश्चात्ताप होत आहे—

**धारिणी** : पण तो अल्पकाल टिकणारा आहे. सदसद्विवेकबुद्धीची ज्योत—

**कृतांत** : माझ्या अंतःकरणांत तेवूं लागली आहे—

**धारिणी** : पण सत्तेच्या उन्मादाची, अहंकाराची असंख्य काजळी पुटं तिच्यावर चढलेलीं असल्यामुळं ती पुन्हां केंव्हां पार विझून जाईल त्याचा नेम नाहीं.

**कृतांत** : विवेकाच्या जागत्या नंदादीपानंच मला तुझ्या पवित्र चरणतीर्थाचा मार्ग दाखविला—

**धारिणी** : पण त्या मार्गांत आड येणाऱ्या व्यक्ति इंद्रजाल कामिनी–

[ इंद्रजाल व कामिनी येतात.

**कृतांत** : तुझ्या चरणतीर्थांतच मला माझ्या पापांच्या कोटी उजळून टाकूं दे—

[ पाय धरूं लागतो.

**कामिनी** : ( पुढें होऊन त्वेषानें ) अहा रे बायल्या ! बायकोचे पाय धरतोस ! तुझ्या अशा विक्षिप्तपणामुळं आमच्या कर्तबगारीच्या कट्यारी आमच्याच उरावर उलटतील की ! ( इंद्रजालास एकीकडे ) आत्तांच हिचं डोकं उडवलं तर—

**इंद्रजाल** : छे–छे ! हा अखेरचा गोड घांस गिळण्याची आत्तांच घिसाडघाई केली तर चौफेर पेटलेला शत्रूंचा वणवा पचनीं पाडणं मुष्कीलीचं होईल.

**कृतांत** : इंद्रजाल, कसल्या कानगोष्टी करतांहात ?

**इंद्रजाल** : महाराज ! भयंकर कहर गुजरला ! सैन्यांत दुफळी माजून अर्ध-अधिक सैन्य बंडखोरांना सामील झालं ! सेनापति वज्रसाराचा खून होऊन—

**कृतांत** : वज्रसाराचा खून ? केला कोणी ?

**इंद्रजाल** : बंडखोरांनीं !

[ शक्तिसिंह, चंडपाल वगैरे अंधारकोठडीच्या झरोक्यांतून डोकावतात.

**चंडपाल** : बंडखोरांनीं नव्हे ! तूं–तूं केलास वज्रसारांचा खून !

**इंद्रजाल** : ( चपापून ) कुणाचे शब्द हे ?

**कामिनी** : ह्या किल्ल्यांत भुताटकी तर नाहीं ?

**धारिणी** : तुमच्याच पापांचीं जिवंत पिशाचं तुमचा पिच्छा पुरवताहेत !

**कृतांत** : तूं गप्प राहा ! शत्रू कोण अन् मित्र कोण हेंच कळेनासं झालं आहे–

**धारिणी** : राज्यलोभानं अंध बनलेल्या भोळ्या बुद्धीला तें कसं उमगणार ?

**कामिनी** : हिच्याच फुसलावणीनं शत्रू छाताडावर चढला आहे–

**इंद्रजाल** : बंडाचा बीमोड करायला मूले कुठार हाच उपाय योजला पाहिजे.

**कामिनी** : संजयाला जिवंत जाळला पाहिजे !

**कृतांत** : तें सर्पाचं पिल्लूं लहानपणींच ठेंचून टाकलं असतं तर—

**कामिनी** : तर सगळीच कटकट कायमची मिटली असती !

**धारिणी** : ( आश्चर्यानें ) महाराज, एका क्षणांत आपला सारा नूर पालटला? आपल्या चंचल स्वभावाचं नवल वाटतं–आपलं हृदय रक्तमांसाचंच आहे ना ?

**कृतांत** : माझ्या हृदयाची जात ह्या पायाखालच्या फरसबंदीला विचार !

[ इंद्रजालासह फणफणत जातो.

**धारिणी** : सैतानांचा सहवास नि सर्वस्वाचा सत्यानाश !

**कामिनी** : आपलं रक्त उगाच कां आटवतेस ? जिवंत जाळलेल्या संजयाची राख सावडायला तुझ्या रक्ताचं पाणी उपयोगी पडेल—

[ जाऊं लागते तोंच बुरखे घेतलेले चंडपाल व शक्तिसिंह चोरवाटेनें प्रवेशून तिला रोखतात. शिपाई धारिणीचे साखळदंड तोडतात.

**शक्तिसिंह** : आईसाहेब, मी शक्तिसिंह ! झटपट बाहेर पडा—

[ धारिणी गुप्त वाटेनें निघून जाते.

**कामिनी** : धांवा–धांवा ! दगा–दगा—

**चंडपाल** : खबरदार ओरडशील तर !

**कामिनी** : अरे देवा ! हीं तर पिशाचं ! ( मूर्च्छित पडते. )

[ ५ ]

इंद्रजालाच्या वाड्याची पिछाडी. रस्ता. संजय, वज्रांग व तारिणी येतात.

**तारिणी** : आपण दोघे पलीकडील भिंताडाच्या बाजूला उभे राहा. मी ताईसाहेबांना घेऊन थेट तिकडेच येते.

**संजय** : पण तारिणी, केवढं भयंकर धाडस करते आहेस तूं !

**तारिणी** : ही वाटाघाटीची वेळ नव्हे. सारीं संकटं जमेला धरूनच मी हें साहस आरंभलं आहे—

**वज्रांग** : पण तो पाहा, तुझा नवराच इकडे येतो आहे—

**तारिणी** : तर मग माझं काम फत्ते झालंच म्हणून समजा—

**संजय** : नवऱ्याचं दर्शन म्हणजे बायकांना शुभशकुनच !

[ तारिणी जाते.

**वज्रांग** : स्त्रियांच्या साहसबुद्धीची सर पुरुषांना खास येणार नाहीं.

[ संजयासह जातो. दुसऱ्या बाजूनें तारिणी राजबहादुराचा हात धरून येते.

**राजबहादुर** : चल, हो दूर. उगीच मला अशी भंडावूं नकोस. भलत्याच बाबतींत अशी हात धुवून माझ्या मागं लागलीस तर नोकरीसकट प्राणांनाहि आंचवावं लागेल मला.

**तारिणी** : ( काकूळतीनें ) असं हो काय ? सांगितलं ना ? वज्रांग महाराजांचा शेवटचा निरोप ताईसाहेबांना कळवायचा आहे. बापाचं आंतडं तुम्हाला कसं कळणार ? चार कच्चींबच्चीं आपणाला असती म्हणजे—

**राजबहादुर** : छे बुवा ! नाहीं त्या गोष्टीसाठीं बायका नवऱ्याचं डोकं उठवतात—इतकंच काय पण कधीं कधीं त्याला लोकांतूनहि उठवतात हेंच खरं !

**तारिणी** : मी तुमच्यापुढं पदर पसरत्यें—

**राजबहादुर** : पसर पसर—तुझ्या पदरांत भरपूर माप घालतों—

**तारिणी** : माझं ऐका एवढं—

**राजबहादुर** : तूं कधीं आजवर माझं ऐकलं आहेस ? तुझ्यापुढं वारंवार नाक घांसून घांसून माझ्या नाकाचा सपाट बत्तासा झाला तरी तुझं नाक वरच ! बाकीं, मी काय आतां तुझी बाकी ठेवतोय् म्हणा—

**तारिणी** : नाथ, क्षमा करायची मला—

[ एकदम डोळ्यांना पदर लावून मुसमुसूं लागते.

**राजबहादुर** : अग अग–हें काय ? तुझ्या डोळ्यांतून असा पाऊस कोसळला कीं हा माझ्या छातीचा कोट पार ढांसळतो बघ ! चल, आधीं माझे पाय धर– ( तारिणी त्याचे पाय धरते. ) आतां कान धर–माझा नव्हे आपला ! अन् आतां–

**तारिणी** : तुम्ही सांगाल तस्सं सारं करतें—

**राजबहादुर** : तुझ्या तोंडाचा मारा माझ्या गालांवर कर ! नाहीं तर तुझं गालफाड अस्सं रंगवून सोडतों –

[ चुंबन घेऊं लागतो. तारिणी लाजून दूर सरते.

**तारिणी** : इश्श ! कुणी पाहील ना ?

**राजबहादुर** : पण कशी गेली गम्मत ! आलीस कीं नाहीं मला शरण ?

**तारिणी** : पण इतकी आर्जव-आळवणी केली तरी अजून...एवढं काय भितां तुम्ही ? हा बुरखा पांघरून चटकन् जाते नि पटकन् परत येते.

**राजबहादुर** : हो–पण तो इंद्रजाल मला कच्चा खावून टाकील ना ?

**तारिणी** : एवढं काय त्या सैतानाचं भय बाळगतां ?

**राजबहादुर** : हळूं बोल—

**तारिणी** : ( मोठ्यांदा ओरडते. ) मला कुणाची भीति आहे ?

**राजबहादुर** : अग पण जरा हळूं—इतकं कोकलतोय्...कानांच्या भिंती झाल्या कीं काय ?...अग, भिंतीला कान असतात, ठाऊक नाहीं ?

**तारिणी** : मग मला ताईसाहेबांच्याकडे लवकर घेऊन चला पाहूं—

**राजबहादुर** : म्हणजे ? मी येऊं तुझ्याबरोबर ? निक्काल लागला !

**तारिणी** : मग मीच जाऊन परत येतें गेल्या पाउलीं ! ( जाऊं लागते. )

**राजबहादुर** : अग, थांब, थांब—

**तारिणी** : एवढासुद्धां विश्वास नाहीं माझ्यावर ?

**राजबहादुर** : विश्वास आहे. पण मला श्वास घ्यायला तरी सवड देशील कीं नाहीं ? जरा विचार करतो—

**तारिणी** : मग करा म्हणे विचार सावकाश. मला आधीं तळघराची चोर-वाट दाखवा—

**राजबहादुर** : दाखवतों, बये, दाखवतों. पण काम उरकून चुटकीसरशी पसार हो परस्परच...पुन्हां मला तोंडसुद्धां दाखवूं नकोस...अन् ही भानगड कुठं बोलूं नकोस. काय ? नाहींतर बेंड फोडशील तूं अन् बाजा करावा लागेल मला !

**तारिणी** : इश्श ! इतकी का मी ही आहे !

[ राजबहादुराबरोबर जाते.

## [ ६ ]

इंद्रजालाच्या वाड्यांतील तळघर. विचारमग्न संजीवनी चहुंकडे कावऱ्या बावऱ्या निराश नजरेनें पाहाते. अन् मग जराशानें केसांच्या दोन बटा घेऊन आपल्या गळ्याभोंवती करकचून आवळूं लागते. तोंचचोर वाटेनें प्रवेशून तारिणी तिचा हात धरते.

**तारिणी** : हां-हां ! हें काय करतां ताईसाहेब ?

**संजीवनी** : प्रत्यक्ष चुलत्यानं केसानं गळा कापल्यामुळं ह्या संजीवनीला शीलरक्षणासाठीं आतां आपला गळा असा केसानंच कापला पाहिजे. सोड मला, तारिणी, इंद्रजालाच्या कसाब-करणीचा अमंगळ क्षण दूर टाळतां येत नाहीं. मग मरणाला जवळ करूं नको तर काय ग करूं ?

**तारिणी** : पण तसं करायची आतां जरूरीच नाहीं. हा बुरखा पांघरा नि ह्या चोरवाटेनं झटपट बाहेर पडा...वाड्याच्या पिछाडीला पडक्या भिंतीच्या आडोशाला युवराज नि वज्रांग उभे आहेत—

[ संजीवनीच्या सर्वांगावर बुरखा घालते.

**संजीवनी** : पण तूं त्या चांडाळाच्या तावडींत सांपडलीस तर ?...स्त्रीजातीची लाज तुझी नि माझी सारखीच नाहीं का ? दुर्दैवानं दगा दिला—

**तारिणी** : तरी पदराआड दडलेली ही कट्यार मला खात्रीनं दगा देणार नाहीं. हो-पण प्रत्येक क्षण मोलाचा आहे-आधीं पुढं व्हा-चालायला लागा—

[ संजीवनी निघून जाते. तिच्या पाठोपाठ तारिणी जाऊं लागते. तोंच 'कैदी फरारी' असें ओरडत पाहारेवाले धांवून येऊन तिला पकडतात. इतक्यांत राजबहादुर येतो.

**राजबहादुर** : ( घाबरून ) काय ? कैदी फरारी ? संजीवनी गायब ? कैदी फरारी ?...

**१ शिपाई** : वेळ बऱ्यावर म्हणून पुन्हां हातीं लागला.

**२ शिपाई** : कुणाच्या तरी कानगोष्टींची कानांना चाहुल लागली म्हणून एकदम धांवून आलों आम्हीं—

**राजबहादुर** : शाब्बास ! भरपूर लांब दिसतात तुमचे कान ! जा आपल्या पाहाऱ्यावर. मी आहे इथं हिच्या उरावर. आमच्या त्या गाढविणीनंच हा सगळा घोटाळा केलेला दिसतो. संजीवनी, दगा देऊन पळून जात होतीस ?

**तारिणी** : छे ! मी पळून जात नव्हते —

**राजबहादुर** : मग काय ? तुला कुणी पळवून नेत होतं ? तें जाऊं दे आतां. पण मी तुला अग संजीवनी म्हणूं कीं अहो ताईसाहेब म्हणूं ? पण ताईसाहेब म्हणायचं तर मग आईसाहेब तरी कां म्हणूं नये ?

**तारिणी** : मला तुम्ही एकेरी नांवानंच हांक मारा...

**राजबहादुर** : एकेरीवर येत नाहीं तें मुळीं प्रेमच नव्हे म्हणा !

**तारिणी** : ह्यांत प्रेमाचा काय संबंध ? बरेच छट दिसतां की तुम्ही !

**राजबहादुर** : छट् ! मी संभावित सभ्य गृहस्थ आहे. आम्ही सरकारी अधिकारी म्हणजे—

**तारिणी** : मोठे महंत-साधूच की नाहीं ?

**राजबहादुर** : स्वार्थसाधु म्हण हवं तर. पण आमच्याजवळ आपपर भेद मुळींच नसतो. जें जें कांहीं दुसऱ्याचं, तें तें सारं आम्ही स्वतांचंच समजतों—

**तारिणी** : कमाल केलीत बेशरमपणाची ! तुम्हाला बायको नाहीं वाटतं ?

**राजबहादुर** : कां नसेल ? तसा मी कुटुंबवत्सल आहे. पण माझी बायको अशी बत्तीस लक्षणी आहे कीं दिवसांतून दहादां अंगावर धांवून येते माझी बत्तीशी पाडायला—

[ इतक्यांत ' राजबहादुर ' अशी इंद्रजालाची हांक ऐकूं येते.

**तारिणी** : आलेच इंद्रजाल. त्यांना सांगते कीं हा तुमचा निमकहराम नोकर माझ्याशीं लघळपणा करीत होता—

**राजबहादुर** : माझे आई ! तुला हात जोडतों. माझ्या प्राणावर गदा आणूं नकोस–गप्प बैस—

[ इंद्रजाल येतो.

**इंद्रजाल** : राजबहादुर ! कसा काय रागरंग आहे ?

**राजबहादुर** : हूजूर ! राग तर भरपूर आहेच. पण ह्यावेळीं आपण अकस्मात् आला नसता तर माझ्या रक्ताचाच रंग आपणाला दिसला असता ! काम भयंकरच भडकलंय् !

**इंद्रजाल** : बहोत खाशी ! आण त्या पिसाळलेल्या कुत्रीला माझ्यासमोर ओढून. संजीवनी, अशी इकडे ये—( तिचा हात धरून तिला जवळ ओढतो. )

**तारिणी** : दूर हो ! तुझ्या सावलीचाहि विटाळ माझ्या पवित्र देहाला व्हायला नको.

**इंद्रजाल** : अजून मस्तवालपणा ? तुझी हड्डी नि हड्डी पिसून काढीन...भर बाजारांत तुझ्या अब्रूचा लिलांव पुकारून जगभर तुझा बदलौकिक करीन...

**तारिणी** : अरे जा ! संजीवनीच्या उज्ज्वल शीलावर शिंतोडे उडवण्याची तुझी माकडाची काय मगदूर ?

**इंद्रजाल** : मुकाट्यानं मला रुकार दे, नाहींतर...राजबहादुर ती दिवटी इकडे घे...ह्या छिनाल दिवटीच्या दृष्टींत माझ्या कट्यारीचं तळपतं तेज पूर्णपणें फाकूं दे—

[ कट्यार सरसावून तारिणीच्या तोंडावरचा बुरखा दूर करतो.

**तारिणी** : अन् माझीहि तेजस्वी कट्यार तुझ्या पापी कामुक दृष्टीला जाळून टाकूं दे—

[ कट्यार उगारून त्याच्या अंगावर धांवून जाते.

**इंद्रजाल** : ( मागें सरून आश्चर्यानें ) कोण ? तारिणी ?

**राजबहादुर** : अरे बापरे ! तूं ? वैरिणी !—

**इंद्रजाल** : हरामखोरा ! तुझ्या गॅलथानपणाबद्दल तुलाच गारद करतों—

**तारिणी** : ( पुढें होऊन ) खुनशी कुत्र्या, चल हाट ! ही तारिणी पतिवधाचा सूड इथल्या इथं घेईल—

**इंद्रजाल** : कैदासणी !

[ इंद्रजाल तारिणीवर कट्यार उगारतो तोंच धारिणी व शक्तिसिंह प्रवेशतात.

**शक्तिसिंह** : ( चपळाईनें इंद्रजालाची कट्यार काढून घेऊन ) आयाबहिणींच्या निरीला हात घालणाऱ्या हैवाना !

**धारिणी** : ( तारिणीला पोटाशीं धरून ) अधिकाराच्या जोरावर कुलशीलवंत स्त्रियांच्या अब्रूवर धाड घालणाऱ्या राक्षसा !

**शक्तिसिंह** : चल, आधीं हिची क्षमा माग–पाय धरून क्षमा माग—

**इंद्रजाल** : ( चिडून ) तारिणीची क्षमा मागूं ?

**शक्तिसिंह** : हो--हो–ह्या तुझ्या मातोश्रीची क्षमा माग ! नाहींतर खांडोळी करून टाकीन तुझी इथल्या इथं. चल, पड पायां—

[ इंद्रजालाची मानगुटी धरून त्याला तारिणीच्या पायांवर डोकें ठेवायला लावतो. पडदा पडतो.

# ४

रस्ता. वज्रांग व धारिणी प्रवेश करतात.

**वज्रांग** : देवि, लोकपक्षाला तुम्ही उघडपणें सामील झाल्यामुळं जनतेंत एक प्रकारचं नव चैतन्य निर्माण झालं आहे.

**धारिणी** : सर्वसत्ताधारी राजा बेजबाबदार, अत्याचारी बनला कीं देशरक्षणाची जबाबदारी देशांतील प्रत्येक व्यक्तीवर येऊन पडते. अन् मग निसर्गाच्या प्रेरणेनंच भिन्न भिन्न प्रकृतिधर्मांचा लोप होऊन समानकार्यासाठीं विराट् संघशक्ति निर्माण होते. आणि तीच प्रबल शक्ति विरोधी शक्तीचा पाडाव करते.

**वज्रांग** : सृष्टीच्या उत्क्रांति–घटनेंत परमाणूंचं कार्य–महात्म्य थोर असतं, त्याचप्रमाणं राष्ट्राच्या उत्क्रांति–चक्रांतहि सामान्य व्यक्तीचं महत्त्व थोर आहे·

**धारिणी** : अत्याचारी जुलूमशाहीचा अतिरेक झाला कीं सामान्य व्यक्ती सुद्धां आगीची ठिणगी बनंते आणि असामान्य कर्तृत्व गाजवून देशघातकी पाशवी शक्तीचं निर्मूलन करायला प्रवृत्त होते.

**वज्रांग** : ह्याचं प्रत्यंतर म्हणजे चंडपाल--शक्तिसिंहासारखे क्रांतिवीर...

**धारिणी** : ( पाहून ) पण हा चंडपाल कां इकडे धांवतो आहे ?

[ चंडपाल घाबऱ्या घाबऱ्या येतो.

**चंडपाल** : सरकार, सरकार, लोकांची सरसकट धरपकड सुरू झाली आहे– तिकडे किल्ल्याच्या मैदानांत कोंडून त्यांची सरसहा कत्तल करण्यांत येणार आहे! स्वतां इंद्रजाल हत्यारबंद शिपायांची तुकडी घेऊन इकडे गुहेच्या तोंडाशीं येऊन भिडला आहे !

**वज्रांग** : मोठाच अनर्थ !

**धारिणी** : समोरच्या संकटाला प्रथम तोंड दिलं पाहिजे—

[ तिघे जातात. संजय व शक्तिसिंह दुसऱ्या बाजूनें येतात.

**संजय** : चल, सोड मला–माझ्या देहाचं धरण बांधून प्रजेच्या निष्पाप रक्ताचा महापूर मला थांबवलाच पाहिजे. माझ्या प्रजेची अमानुष कत्तल ! माझ्या सर्वांगाचा कसा भडका भडका उडाला आहे—

**शक्तिसिंह** : पण युवराज, माझ्या गळ्याची आण आहे. आपण आपले प्राण धोक्यांत घालूं नका–

**संजय** : मग काय ? माझी प्रजा तिकडे शेळ्यां–मेंढरांसारखी चराचरा कांपली जात असतांना मी इकडे दऱ्याखोऱ्यांत काळं तोंड घेऊन दडून बसूं ?

**शक्तिसिंह** : लाख जीवांचा खुर्दा उडावा पण लाखांचा पालनवाला हा पृथ्वीमोलाचा हिरा सुखरूप राहावा ! युवराज, मी एकटा दुष्मानांना धूळ चारतों–लोकांचं रक्षण करतों–पण आपण तिकडे येऊं नका—

**संजय** : शक्तिसिंह, तुझ्या इमानी रक्ताची रग पाहिली कीं माझ्या अंगावर डोंगराएवढं मांस चढतं. पण मी काय माझा राजधर्म सोडूं आणि तुझ्यासारखे मोलाचे मोहरे इरेला पाडूं ? तुझ्यासारखे थकलेले जीव पणाला लावूं अन् मी माझी कातडी बचावूं ?

**शक्तिसिंह** : युवराज, युवराज, हे आपले ब्रह्मांड-मोलाचे एकेक बोल ऐकले कीं, ह्या म्हाताऱ्या डोळयांत आनंदाचीं आसवं टचकन् उभी राहातात. आपल्या नांवासाठीं माझ्या सारखे शेंकडों शक्तिसिंह आपल्या देहांचे सेतू बांधून देवावर्तीला तारून नेतील ! पण—

[ पडद्यांत-लोकांची दंगल-धांवपळ, किंकाळ्या-आरोळ्या वगैरे.

**संजय** : ऐक ! धरपकडींत सांपडलेल्या लोकांच्या ह्या केविलवाण्या किंकाळ्या ऐक-माझं कर्तव्य मला टाहो फोडून हांका मारीत आहे. गेलंच पाहिजे मला-

[ जाऊं लागतो.

**शक्तिसिंह** : ( आडवून ) नका, नका, युवराज, आपण त्या कत्तलीच्या खाईत उडी घेऊं नका-ह्या जवानलेल्या म्हाताऱ्या मर्दुमकीची ऐनवेळीं अशी हिंमतखेची करूं नका-मी एकटाच जातों-पण आपण येऊं नका—

**संजय** : तें शक्यच नाहीं. मी देवावर्तीचा सार्वभौम राजा आहे. राजाचा जन्म राजमहालांत आरामानें परांच्या गादीवर लोळण्यासाठीं नसून प्रजेसाठीं प्रसंगीं प्राणार्पणहि करण्यासाठीं असतो, हें त्या कृतांताला दिसलंच पाहिजे.

[ आवेशानें जातो. पाठोपाठ शक्तिसिंहहि जातो. 'संजय महाराज-की जय'— अशा गर्जना ऐकूं येतात. क्रोधानें खवळलेला कृतांत इंद्रजालासह येतो.

**कृतांत** : ऐका ! हा जयजयकार ऐका ! आमचा धिक्कार आणि आमच्या वैऱ्याचा जयजयकार ! लाख लोकांच्या जिभांनीं संजयाचा जयघोष जाहीरपणें करावा—पोराटोरांनींसुद्धां निंदानालस्ती करून उघडपणें आमचा तीव्र निषेध चालवावा ह्याचा अर्थ काय ? हा त्या संजयाचा जयजयकार नसून, इंद्रजाल, तुमच्याच राज्य-कारभाराच्या नालायकीचा डंका-डांगोरा आहे ! समजलांत ?

**इंद्रजाल** : आपसांत यादवी माजल्यावर दुष्मन् जोरावणारच. त्यांतून, धारिणीदेवींचं उघड वैर पत्करलं पण दरबारी लोकांचं गुप्त वैर नको, अशी परिस्थिति आली आहे—

**कृतांत** : पण दरबारी धोरण राखलं नाहीं, भोंवतालच्या परिस्थितीला पारखलं नाहीं, हा दोष कुणाचा ?

**इंद्रजाल** : छातीसमोर सरसावणारी कट्यार हिंमतींत आवरतां येते. पण बगलेमागून येणारी छुपी कट्यार चोरटा दगा देते !

**कृतांत** : तेंच–तेंच ! माझ्या साम्राज्यसत्तेचा डोलारा आंतून इतका पोंखरला जाऊन ढांसळण्याच्या बेतांत येईपर्यंत तुमचं धोरणी, मुत्सद्दी म्हणविणारं मंत्रीमंडळ काय झोंपा ताणत होतं ? गुप्तहेरांचं खातं काय घोरत पडलं होतं ? हजारों कोसपर्यंत सुयंत्रितपणें राज्यकारभार हांकारला जातो, ही माझ्या साम्राज्य-सत्तेच्या शिस्तीची–इभ्रतीची कीर्ति ! पण आज ती पार धुळीला मिळाली ! लठ्ठ तनख्यांचे तोबरे चारून तुमच्यासारखे हत्ती मी पोसतों, तें काय शेळपट जनतेनं माझ्या सत्तेशीं अशी वाघाप्रमाणं झुंझ खेळावी म्हणून ?

**इंद्रजाल** : पण महाराज, दोस्तीच्या पोटींच दुस्मनी पैदा झाली—सरदार-मांडलिकांनींच सार्वभौम–सत्ता झुगारण्याचा घाट घातला—

**कृतांत** : बिशाद काय मांडलिकांची नि सरदार-मानकऱ्यांची ! किताबांचे नि जहागिऱ्यांचे तुकडे चारून गोंजारलेलीं तीं लोचट पागल कुत्रीं ! शेंफारून गुरगुरायला लागतील तर तिथल्या तिथं राजदंडानं ठेचून टाकलीं पाहिजेत. तें कांहीं नाहीं. साम्राज्याच्या कोनाकोपऱ्यांतून उसळून उठलेला हा बंडाचा वणवा दोन दिवसांत चळवळ्या लोकांच्या रक्तानं विझलाच पाहिजे. तसंच, ताबडतोब धनंजयाच्या राज्याभिषेकाची तयारी करा...तिकडे बंडखोरांच्या मस्तकावर रक्ताचा अभिषेक आणि इकडे खासगी खास दरबारांत धनंजयाला राज्याभिषेक ! दोन्ही समारंभ आजच्या आज एकाच वेळीं साजरे झाले पाहिजेत.

**इंद्रजाल** : जशी महाराजांची आज्ञा !

[ जातात.

## [ २ ]

भीमरुद्राच्या किल्ल्यानजीकचें मैदान. कत्तल होत असलेल्या लोकांच्या किंकाळ्या ऐकू येतात. कामिनी कांहीं शिपायांसह येते.

**कामिनी** : त्या झाडींत लपून बसा अन् मी इशारा करतांच धांवून या. सांगितल्याप्रमाणं सारी तयारी जय्यत ठेवा. निकराचा प्रसंग शक्तीपेक्षां युक्तीनंच निभावून न्यावा लागेल—

[ शिपाई जातात. दुसरे कांहीं शिपाई पळत येतात.

अरे, असे पळत काय सुटलांत ?

**१ शिपाई** : शत्रूपुढं निभाव लागणं मुष्कील आहे.

**२ शिपाई** : जिवाची जिकीर नाहीं, पण आमच्या बायकापोरांची फिकीर—

**कामिनी** : अहा रे बेहिमती ! तरवारीच्या चाकरींत फुकट जिणं गमावलंत. ती पाहा, तिकडून बंडखोरांची टोळी येत आहे–तुटून पडा तिच्यावर. चाकरीचं इमान राखलंत तर भाग्याची बढती होईल. पण जरा कसूर होईल तर गर्दन मारली जाईल —

[ जाते. शिपाई परत जाऊं लागतात. तोंच चंडपाल येतो.

**चंडपाल** : मर्दांनों ! माघारीं फिरा ! आपल्याच जातभाईच्या रक्तानं आपले हात रंगवून पापाचे घडे भरतां ? पोट जाळण्यासाटीं सैतानांची चाकरी करतां, त्यापेक्षां पोटांत कांटे कां कोंबत नाहीं ? अरे, रणमैदानावर उघड्या छातीनं वैऱ्याशीं सामना देणारे तुम्ही लढवय्ये वीर ! आज असं दुबळ्या बायकांपोरांवर, म्हाताऱ्याकोताऱ्यांवर हत्यार चालवतां ? मर्द शिपाईगडी म्हणवतां अन् असं खाटक्याचं कर्म करतां ? अरे, थूः थूः तुमच्या शौर्यावर ! पाक रक्ताचे असाल तर चला, फिरा माघारीं अन् आपल्या राजासाठीं लढायला उभे राहा ! फुकट प्राणाच्या मोलानं नरकाची मिळकत मिळवूं नका, आपल्या वीरकुळाचं उजळ नांव मळवूं नका ! चला माझ्याबरोबर ! बोला, संजय महाराज की जय !

[ सर्वजण जयजकार करीत चंडपालाबरोबर जातात. तोंच इंद्रजाल येतो.

**इंद्रजाल** : निमकहराम अलवलाद ! ही फंदफितूरी ?

[ समोरून वज्रांग येतो.

**वज्रांग** : ही फंदफितुरी नव्हे ! न्यायाची तरफदारी आहे ! त्या अडाणी शिपायांत जेवढी माणुसकी आहे तेवढीसुद्धां तुम्हां मुत्सद्दी म्हणविणाऱ्या राज्यकर्त्यांत नाहीं. शांततेच्या नि सुव्यवस्थेच्या नांवाखालीं निःशस्त्र प्रजेची लांडगेतोड करून देवावर्ताचा कत्तलखाना केलास ?

**इंद्रजाल** : मी अजून सिंहासनाशीं बेइमान झालों नाहीं—

**वज्रांग** : सिंहासन ? निष्पाप प्रजेच्या रक्तानं रंगलेलं, पतिव्रतांच्या मूक शापांनीं दग्ध झालेलं, कृतांताच्या पापी स्पर्शानं विटाळलेलं तें सिंहासन—

**इंद्रजाल** : अखेर, मी माझ्या स्पर्शानं पवित्र करणार आहे !—

**वज्रांग** : हें तुझं नीच कारस्थान आम्ही पूर्वीच ओळखलं आहे—पण तें शेवटाला जाण्यापूर्वीच—( तरवार उपसतो. )

[ दोघांची चकमक झडते. इंद्रजाल घायाळ होऊन पडतो. तोंच कामिनी येते. तिच्याबरोबर संजयाचें रक्ताळलेलें नकली शिर भालफळावर टांगून शिपाई ओरडत येतात.

**शिपाई** : संजय ठार झाला ! संजय ठार झाला !

**कामिनी** : बंडाचा बीमोड झाला !

**वज्रांग** : ( भांबावून ) युवराज ठार झाले ? ( हातांतून तरवार गळून पडते. )

**कामिनी** : तें पाहा, तुझ्या युवराजाचं शिर !

**वज्रांग** : अरेरे ! उत्साहाचे, शौर्याचे मेरुमांदार पार ढांसळले !

**इंद्रजाल** : ( शिपायांस ) बघतां काय ? करा गिरफदार !

[ शिपाई वज्रांगाची तरवार कब्ज करून त्याला वेढतात.

**कामिनी** : बेअकली नादान ! तुझा संजय जिवंत आहे ! हें शिर लटकं आहे !

[ शिर लाथेनें उडवून विकट हास्य करते. संजयाचा जयजयकार ऐकूं येतो.

**वज्रांग** : अरेरे ! माझी तरवार—

**कामिनी** : तुझी तरवार जप्त झाली—

**इंद्रजाल** : ही माझी तरवार तुझ्या मदतीला आली !

[ एकदम छातींत तरवार भोसकतो. वज्रांग घायाळ होऊन पडतो.

**वज्रांग** : चांडाळांनों ! अखेर, मला दगलबाजीनंच ठार केलंत अं ! युवराज...

[ प्राण सोडतो. इंद्रजाल त्याच्या प्रेताला लाथ मारतो.

**कामिनी** : ( आनंदानें ) मेला ! वज्रांग मेला !

**इंद्रजाल** : बंडखोरांचा पुरुषार्थ ठार झाला !

[ इतक्यांत रणवेषांत तारिणी येते.

**तारिणी** : पण अजून स्त्रियांचं शौर्य जिवंत आहे !

**कामिनी** : अगबाई ! ही तर महिषासुरमर्दिनी !

[ घाबरून पळून जाते.

**इंद्रजाल** : देवावर्तांतल्या बायकासुद्धां एवढ्या उद्दाम बनल्या अं !

**तारिणी** : तुझ्यासारखे पुरुष षंढ दगाबाज बनले म्हणूनच आम्हाला मर्द व्हावं लागलं आहे--चल, जातीचा मर्द असशील तर माझ्याशीं लढायला तयार हो !

[ इंद्रजालाशीं वगैरे लढत असतांनाच एक शिपाई पाठीमागून तिला वार-
करतो. तारिणी मरते. इतक्यांत रक्तानें न्हालेला शक्तिसिंह येतो.

**शक्तिसिंह** : बायाबापड्यांवर हत्यार चालवणाऱ्या नामर्दानों !

[ शिपायांना ठार करतो.

**इंद्रजाल** : शक्तिसिंह ! आज तुझंहि मरण ओढवलेलं दिसतं—

**शक्तिसिंह** : बटकीच्या पोरा ! षंढाची जात नि तरवारीचा तोरा ? बायकां-वर हत्यार चालवून आपली बहादुरी मिरवतोस ? अरे नपुंसका ! हातांत तरवार धरलीस त्यापेक्षां बांगड्या भरून एखाद्या बाजारबसवीचं लुगडं कां नाहीं ढुंगणाला गुंडाळलंस ?

**इंद्रजाल** : थेरड्या, जबान बंद कर. हिंमत असेल तर—

[ शक्तिसिंह तरवार फेंकून देऊन एकदम इंद्रजालाचें नरडेंच धरतो.

**शक्तिसिंह** : अरे, हा थेरडा शक्तिसिंह तुझ्यासारख्या शेंकडों जवानांना कच्चा खावून टाकील ! तुझ्यासारखीं चिलटं चिरडायला तरवार रे कशाला ? तुझं नरडं कडाड फोडून तुझं रक्त घटाघटा प्याल्याखेरीज माझा तापलेला जीव निवणार नाहीं ! बेट्या, माझ्यापुढं ताकदीचा दिमाख ? तुझंच काय, तुझ्या बापजाद्याचंहि बारसं मी जेवून बसलोंय् ! (त्याला खालीं पाडून त्याचें नरडें दाबतो. इंद्रजाल किंचाळतो. ) बोल, देवावर्ताच्या सिंहासनावर खिळलेले हे तुझे पापी लोभी डोळे फोडूं कीं उलट्या काळजासकट तुझीं आंतडींच बाहेर ओढूं ?

**इंद्रजाल** : मेलों–मेलों ! धांवा–धांवा !

[ इतक्यांत कांहीं शिपाई धांवत येऊन शक्तिसिंहाला वेढतात. तो इंद्रजा-
लाला सोडून चपळाईनें आपली तरवार घेतो. इंद्रजाल चटकन पळून
जातो. शिपायांशीं शक्तिसिंहाची चकमक झडते. कांही शिपाई मरतात.
बाकीचे पळून जातात.

**शक्तिसिंह** : भेकडानों ! कुठं पळणार ? हा तुमचा कर्दनकाळ पिच्छाच पुरवणार !

[ जातो. तोंच धारिणी व संजीवनी येतात. वज्रांग–तारिणींच्या प्रेतांकडे
त्यांचें लक्ष्य जातें.

**धारिणी** : अरे देवा ! हा काय अनर्थ ! तेजस्वी तारे खळकन् निखळून पडले !

[ संजीवनी वज्रांगाच्या प्रेताला कवटाळून हंबरडा फोडते.

**संजीवनी** : बाबा, बाबा ! मला एकटीला सोडून कसे हो गेलांत ?

**धारिणी** : संजीवनी, तुझ्या शोकांत सारा देवावर्त वाटेकरी आहे...तूं वीरकन्या आहेस ! हा शोक आंवरून घे—तुझ्या अश्रूंबरोबर जनतेचा धीर गळून जाईल...वज्रांगांचं देशसेवेचं, राजनिष्ठेचं व्रत अव्याहत चालू ठेवून देशऋणाबरोबर पितृऋणाचीहि फेड आतां तुला करायला हवी...? तूंच असा शोक करूं लागलीस तर संजयाला कोण धीर देणार ?

[ इतक्यांत चंडपाल येतो.

**चंडपाल** : घात झाला ! कत्तलीच्या रणधुमाळींत युवराज बेपत्ता झाले—

[ शक्तिसिंह येतो.

**शक्तिसिंह** : अन् आतां तर भलतीच भुमका उठल्यामुळं आपल्या लोकांचं रक्त गोठून गेलं आहे—

**धारिणी** : भुमका ? ती कोणती ?

**शक्तिसिंह** : तें अमंगळ मुखानं उच्चारायला धीर नाहीं नि सवडहि नाहीं— घारीच्या नजरेनं चहुंकडे युवराजांचा तलास केला पाहिजे—चल, चंडपाल—

[ चंडपालासह लगबगीनें जातो. शिरावर वज्राघात झाल्याप्रमाणें दुक्खातिरेकानें संजीवनी दिङ्मूढ होते.

**धारिणी** : म्हणजे ? ह्याचा काय अर्थ ?

**संजीवनी** : भयंकर अनर्थ हाच ह्याचा अर्थ ! माझ्या सौभाग्याचाहि सर्वेश्वर अंतर्धान पावला !

**धारिणी** : चूप ! भलतंच कांहीं तरी !

**संजीवनी** : वाईट वार्ता सहसा खोट्या ठरत नसतात—

**धारिणी** : पण ही वार्ता खात्रीनं खोटी...संजीवनी !...

**संजीवनी** : आईसाहेब ! पित्याचं प्रेमळ छत्र कायमचं नष्ट झालं म्हणून पोरीच्या पिळवटलेल्या आंतड्यानं शोकाचा हंबरडा फोडला. पण आतां माझे अश्रू पार आटून गेले...अद्यापि कायेनं कुमारिका असले तरी वाचामनानं मी युवराजांची वीरपत्नी आहे ! वीर स्त्रियांचं सौभाग्य म्हणजे देवानं दिलेली भाग्याची ठेव ! स्वार्थसंकुचित संसारांत स्वतांच्या सुखाकारणीं तिचा विनियोग न करतां ती ठेव देशदेवाच्या सेवेसाठींच खर्च करायची असते ! युवराज गेले—

**धारिणी** : अग, अशी वेड्यासारखी काय बडबडतेस ?

**संजीवनी** : हें पाहा, माझं सौभाग्य मी राष्ट्रदेवाला अर्पण करतें ! संजय महाराजांच्या मनोमन पत्नीचा हा सौभाग्यतिलक–संजीवनीचा कुंकुमतिलक–

[ कुंकूं पुसूं लागते. तोंच संजय येतो.

**संजय** : पुसूं नकोस ! कुंकुमतिलक पुसूं नकोस !

**धारिणी** : माझा संजय ! ( हर्षभरानें पोटांशी कुर्वाळते. )

**संजीवनी** : माझा सौभाग्य-देव !

[ शक्तिसिंह व चंडपाल येतात.

**शक्तिसिंह** : लोक हो ! बोला, संजयमहाराजांचा जयजयकार !

[ पडद्यांत–लोक जयजयकार करतात.

**धारिणी** : इडापीडा टळली ! देवाची कृपादृष्टि वळली !

**शक्तिसिंह** : माझ्या राजाला मार्कंडेयाचं औक्ष लाभणार !

**संजय** : माझ्या मरणाची खोटीच हूल उठवून इंद्रजाल-कामिनीनं आमच्या लोकांना नाउमेद करण्याचा प्रयत्न केला—

**शक्तिसिंह** : पण अखेर, काळं तोंड घेऊन त्यांनाच पळ काढावा लागला–

**धारिणी** : तरी पण दगा देऊन दुर्दैवानं, हा पाहा, वज्रांगांचा बळी घेतला !

**शक्तिसिंह** : हा तर भयंकर वज्राघात !

**संजय** : अरेरे ! संजयाचं छत्र गेलं ! देवावर्ताचं शौर्य, धैर्य, चातुर्य आज निष्प्राण झालं ! संजीवनी !...

**संजीवनी** : स्वातंत्र्याचा मार्ग राष्ट्रभक्तांच्या रक्तानंच रंगलेला असतो—

**धारिणी** : धारातीर्थी देह ठेवून वज्रांग स्वर्गाची पायरी हक्कानं चढले !

**संजीवनी** : अन् तारिणीनंहि त्यांना शेवटपर्यंत सोबत केली !

**शक्तिसिंह** : देवावर्ताच्या ललाटरेषा उजळण्यासाठीं ह्यांच्याच पवित्र रक्ताचा टिळा लावून, इमानी हाडांचं वज्रकंकण बांधून पुढचा क्रान्ति-मार्ग चोखाळला पाहिजे. लोक हो ! हताश होऊं नका. दुणावलेल्या धैर्यानं पुढं पाऊल टाका !

**चंडपाल** : राजासाठीं जीवाची सांड करणं, हाच प्रजेचा धर्म ! युवराजांच्या साठीं, देवावर्ताच्या ह्या पंचप्राणासाठीं—

**धारिणी** : आपल्या प्राणांच्या पायघड्या पसरून अन्यायाशीं टकरा देत

जुलूमशाहीच्या होमकुंडांत आनंदानं आत्माहुति द्यायला सिद्ध व्हा !

**संजीवनी :** हाच तेजस्वी संदेश हे हुतात्मे आपणाला देत आहेत !

[ सर्वजण वज्रांग–तारिणींच्या कलेवरांना अभिवंदन करतात. पडदा पडतो.

## [ ३ ]

कालकंदरीचा प्रदेश. रस्ता. राजबहादुर येतो. सायंकाळची वेळ.

**राजबहादुर :** कुठं तरी एकांतांत जावं अन् मोकळ्या गळ्यानं, मोकळ्या मनानं निवांतपणें भोकाड पसरून मनमुराद रडावंसं वाटतंय् ! पण असं अरण्यरुदन करून तरी काय फायदा ?

[ शक्तिसिंह येतो. त्याला पाहातांच राजबहादुर गळा काढून रडूं लागतो.

**शक्तिसिंह :** कोण रे तूं ?

**राजबहादुर :** ( मोठ्यांदा हुंदके देत ) मी एक देशभक्त आहे !

**शक्तिसिंहः :** देशभक्त ? अन् असा रडका ?

**राजबहादुर :** देशाचं दैन्य बघून माझं काळीज फाटतंय् हो !

**शक्तिसिंह :** ( जवळ जाऊन पाहून ) अरे, तूं तर राजबहादुर ! सैतानांचा सांथीदार–( तरवारीला हात घालतो. )

**राजबहादुर :** पूर्वी होतों. पण आतां नाहीं. तुमच्या पायां पडतो. मला मारूं नका. एका जहाल देशभक्ताच्या पवित्र रक्तानं आपली तरवार विटाळूं नका.

**शक्तिसिंह :** ( हंसून ) पण काय रे, ही देशभक्तीची दीक्षा तुला कुणी दिली?

**राजबहादुर :** नशीबानं ! जगायचाच पडला वांधा म्हणूनच सुरूं केला हा देशभक्तीचा धंदा !

**शक्तिसिंह :** तुझ्यासारख्या पोटभरू दांभिक देशभक्तांचा पुंडावा आजकाल फार माजला आहे ! तोंडानं माराव्यात लोककल्याणाच्या बाता सव्वा हात !—

**राजबहादुर :** अन् आंतून सफाईनं फिरवावा लोकांच्या डोक्यावरून हात ! कसं अगदीं माझ्या मनांतलं बोललांत हो !

**शक्तिसिंह :** पण तूं तर त्या इंद्रजालाच्या गळ्यांतला ताईत–

**राजबहादुर** : पण त्यानंच गळफांस लावला ! त्या हरामखोरानं तारिणीची कत्तल करून माझा संसार बुडवला अन् मलाहि नोकरीवरून बडतर्फ केलं... म्हणून बेकार भटकण्यापेक्षां—

**शक्तिसिंह** : हें देशभक्तीचं ढोंग सुरू केलंस वाटतं ?

**राजबहादुर** : ढोंग नव्हे हं ! तसा मी वज्रांगांच्या तोडीचा अस्सल देशभक्त आहे. तुरुंगांत गेल्यामुळंच देशभक्तीचा टिळा वज्रांगाच्या कपाळीं प्रथम चिकटला. मी तुरुंगांत गेलों नसलों तरी पण माझाहि थोडाफार संबंध तुरुंगाशीं पोहोंचतो आहे–

**शक्तिसिंह** : तो कसा काय ?

**राजबहादुर** : अहो, वज्रांग कैदेंत होते त्यावेळीं मी तुरुंगाचा अधिकारी होतों. त्यांच्याबरोबर मलाहि तुरुंगवास घडलेलाच आहे. तेव्हां त्यांच्याप्रमाणं संपूर्ण नसलों तरी अर्धवट देशभक्त मी खास आहे !

**शक्तिसिंह** : अर्धवट देशभक्त आहेस हें मात्र अगदीं खरं बोललास ! भल्या माणसा ! देशभक्ती म्हणजे सुळावरची पोळी आहे समजलास ? देशासाठीं तनमनधन अर्पण करावं लागतं–

**राजबहादुर** : हां ! तेवढं मात्र मला जमायची नाहीं. कारण, धन तर माझ्याजवळ नाहींच. होती नव्हती ती सारी जिंदगी जप्त होऊन सरकारची धन झाली ! अन् एकुलती एक बायको गेल्यामुळं जगांतून माझं मन उडून गेलं आहे ! तेव्हां, धन नाहीं, मन नाहीं ! आतां फक्त हें तन अन् उरलेलं आयुष्य एवढंच काय तें माझ्या मालकीचं असं शिल्लक उरलेलं आहे ! तात्पर्य, तनमनधन सोडून सर्व कांहीं देशाला अर्पण करण्याची माझी तयारी आहे.

**शक्तिसिंह** : अगदीं अट्टल आहेस की !

**राजबहादुर** : अट्टल म्हणजे ? जीव नुसतो तडफडतोय् ! त्या इंद्रजालाला मूठमाती देऊन तारिणीच्या कत्तलीचा सूड उगवल्याखेरीज माझा तळमळणारा अंतरात्मा शांत होणार नाहीं !

**शक्तिसिंह** : तूं ठार करणार इंद्रजालाला ?

**राजबहादुर** : शंका आहे का ? त्याच्याच पाळतीवर आहे मी. आत्तांच– आज रात्रीं किल्ल्यांत खास दरबार भरून धनंजयाला राज्याभिषेक होणार आहे !

[ संजीवनी येते.

**संजीवनी** : काय ? धनंजयाला राज्याभिषेक ?

**शक्तिसिंह** : हा सांगतोय्...

**राजबहादुर** : खरी खबर आहे. मी देशभक्त असलों तरी सत्यवक्ता आहे.

**संजीवनी** : शक्तिसिंह ! ठरलं ! आज राजवाड्यावर हल्ला करून शत्रूचा बेत हाणून पाडायचा ! भरपूर मनुष्यबळ मात्र पाहिजे—

**शक्तिसिंह** : माणूसबळ खूप आहे. पण—

[ कांहीं लोकनायकांसह चंडपाल येतो.

**चंडपाल** : पण कत्तलीच्या कहरानं लोक भेदरले आहेत—

**१ लोकनायक** : आजच्या अनर्थामुळं आमचीं मनं खचून गेलीं आहेत--

**शक्तिसिंह** : निकराच्या वेळीं कच खातां ? देवावताची प्रजा रडण्यासाठीं नव्हे, दुस्मनाला रडविण्यासाठीं जन्माला आलेली आहे. तुम्हांला तुमच्या बायकापोरांची, घराण्याच्य अब्रूची चाड असेल तर रक्ताचा सूड रक्तानंच घ्या !

**संजीवनी** : आपल्या कुळाचा, देशाचा, राजाचा कांहीं अभिमान असेल तर एकजूटीनं शत्रूला सामना द्या !

**चंडपाल** : अहो, प्रसंगीं क्षुद्र मुंग्यामाशासुद्धां कडकडून चावून सर्पाचा फडशा पाडतात. मग आपण तर माणसासारखीं माणसं ! मरायचंच असेल तर नामर्दाच्या मरणानं न मरतां सिंहाचं शौर्य गाजवून मर्दासारखे मरूंया !

**संजीवनी** : एक निर्धार ! मारूंया आणि मरूंया !

**शक्तिसिंह** : निश्चयाचं बळ तेंच परमेश्वराचं पाठबळ !

**१ लोकनायक** : ताईसाहेब, तुमच्या अमृतवाणीनं आमच्या अंगीं भीमशक्तीचा आवेश चढला !

**२ लोकनायक** : आमचा उत्साह अनंतपटीनं वाढला ! मारूं किंवा मरूं !

**संजीवनी** : आजच्या आज कृतांताला सिंहासनावरून खालीं ओढूंया !

**राजबहादुर** : अन् इंद्रजालाचंहि नरडं कडाडदिशी फोडूंया !

[ सर्वजण संजयाचा जयजयकार करीत जातात.

[ ४ ]

खास दरबार. कामिनी, इंद्रजाल, सरदार, मानकरी वगैरे. कृतांतराय धनंजयाच्या मस्तकावर मुकुट चढवीत आहे. धनंजय तो झिडकारीत आहे.

**धनंजय :** बाबा, हा मुकुट मी डोक्यावर साफ चढवून घेणार नाहीं.

**कृतांत :** पाहिलंत इंद्रजाल ? धारिणीच्या लाडानं पोरटं कसं बहकलं आहे—

**इंद्रजाल :** कुमार, वडिलांची आज्ञा पाळणं मुलांचं कर्तव्य आहे.

**धनंजय :** अन् स्वतांच्या मतलबासाठीं मुलांना कुमार्गावर खेचणं हें वडिलांचं कर्तव्य आहे ! नाहीं ?

**कामिनी :** पोरबुद्धी म्हणून जों जों गय करावी तों तों तूं आपला जास्तच चेकाळून ताळ सोडत चाललास. मुकाट्यानं मुकुट घालून घे—

**धनंजय :** माझ्या डोक्याच्या बेताचा नसलेला हा मुकुट, तुम्हां सर्वांच्याच प्राणांवर मात्र बेतेल ! माझ्या अन्नदात्या युवराजांनीं रानावनांत रखडत आपले डोळे परमेश्वराच्या शोधासाठीं आकाशाकडे रोखावेंत ! अन् ह्या त्यांच्या हक्काच्या मुकुटाकडे मी माझी बेमान बदनजर वळवावी काय ?

**कृतांत :** काय म्हणालास ? तुझा अन्नदाता तो करंटा संजय ?

**धनंजय :** अलबत् ! ह्या धनंजयाचा हा पिंड आजवर कुणाच्या अन्नावर पोंसला गेला आहे ? तुमच्या सत्तेचा उन्मत्त विलास कुणाच्या मालमत्तेवर चालला आहे ? देवावर्ताचं सिंहासन् कुणाच्या मालकीचं आहे ?

**कृतांत :** हा निर्णय लावण्याची मुखत्यारी तुझ्याकडे आलेली नाहीं.

**इंद्रजाल :** ती आमच्या तरवारीकडे आहे !

**कृतांत :** फांसावर लटकलेल्या लाख लोकांच्या लांब जिभा माझ्या हक्काचा निर्वाणीचा निर्णय देत आहेत !

**कामिनी :** कत्तल झालेल्या लोकांच्या किंकाळ्यांनीं दादाच्या सार्वभौम सत्तेची द्वाही दुनियेंत फिरविली आहे !

**धनंजय :** बेगुन्हा प्रजेच्या रक्तानं माखलेल्या तख्तावर मी बसावं म्हणतां ? युवराजांच्या मालकीचा हा तेजस्वी मुकुट—

**कामिनी :** पाहा, पाहा, ह्या दैदीप्यमान् रत्नजडित मुकुटाचं अलौकिक तेज तरी पाहा ! ह्यांतले हे पृथ्वीमोलाचे हिरे तुझ्या मूर्खपणाला हांसताहेत !

**धनंजय :** तुमच्याच महत्त्वाकांक्षेला हे हिरे असे उपहासानं हांसताहेत ! छे-छे ! ह्याचं तेज मला सहनच होत नाहीं. तेजस्वी रत्नांचे डोळे रोखून हा मुकुट माझ्यावर क्रोधाचा अग्निवर्षाव करतो आहे ! (तोंड फिरवितो.)

**इंद्रजाल :** बाळवयांतल्या ह्या प्रगल्भ बुद्धीचं खरोखरीच मोठं कौतुक वाटतं. पण युवराज,—

**धनंजय :** खबरदार मला युवराज म्हणाल तर ! मी युवराज नाहीं—

**कामिनी :** पण हा मुकुट तुझ्या मस्तकावर चढला कीं तुझा जयजयकार...

**धनंजय :** पण त्या तुमच्या जयजयकाराबरोबरच अखिल देवावर्तांत माझ्या धिक्काराच्या आरोळया उठतील, त्याची काय वाट ? बाबा, नसता अट्टाहास करण्यापेक्षां हा मुकुट संजयदादाच्या मस्तकावर ठेवा ! माझं ऐका—

**कामिनी :** पण तुझ्या संजयदादाचं मस्तक ठिकाणावर राहील तेव्हां ना ?

**धनंजय :** द्या तो मुकुट. असाच जाऊन मी माझ्या हातांनीं दादाच्या मस्तकावर चढवतों—

[ कृतांताच्या हातून मुकुट हिसकावून घेऊं लागतो. तोंच अकस्मात् संजय येतो. सर्व सरदार-मानकऱ्यांच्या मुद्रेवर विस्मयानंद उमटतो.

**संजय :** थांब! थांब कुमार ! ह्या मुकुटानं तुझंच मस्तक मंडित करण्यासाठीं हा संजयच इकडे धांवून आला आहे !

**धनंजय :** युवराज-युवराज ! (धांवत जाऊन मिठी मारतो.)

**कृतांत :** पाजी बंडखोर !

**संजय :** अपशब्दांचे तीर आवरते घेऊन मुकाट्यानं तो मुकुट इकडे द्या—

[ हात पुढें करतो.

**कामिनी :** हात मागें घे ! (मुकुट आपल्या हातीं घेते.)

**कृतांत :** अतिप्रसंग करशील तर फुकट मरशील !

**संजय :** कृतांता ! माझ्या जन्मसिद्ध हक्काचा हा मुकुट मी माझ्या हातांनीं धनंजयाच्या मस्तकावर चढवितों आणि तुझी इच्छाच असेल तर त्याच

हातांनीं मी माझं शिरकमल तोडून तुझ्या आसुरी आकांक्षेला सादर करतों ! पण जास्त हेका चालवशील तर ह्या तरवारीच्या जिभेनं माझा हक्क मला शाबीत करावा लागेल. बऱ्या बोलानं मुकुट इकडे आण—

**कृतांत** : इंद्रजाल ! ह्या तोतयाला इथल्या इथं करा ठार—

**इंद्रजाल** : तरवारीचा एकच वार—

**धनंजय** : खबरदार !

[ इंद्रजाल चपापून मागे हटतो.

**कामिनी** : धनंजयाच्या धमकावणीनं दबून मागें हटतां ? मोठं नवल आहे !

**कृतांत** : माझ्यापेक्षां ह्या पोरट्याची प्रतिष्ठा ?

**संजय** : अर्थात् ! धनंजय राजपुत्र आहे ! राजपुत्राच्या अंगच्या अभिजात प्रखर तेजाची कल्पना तुला कुठून येणार ? तूं कधीं राजपुत्र होतास ? तुझ्या जुलुमी तरवारीनं राजेपणाचा टिळा तुझ्या कपाळीं लावला ! अन् धनंजय मात्र जन्मानं राजपुत्र ठरला ! राजपद राजवैभवांत नव्हे तर राजगुणांतच सामावलेलं असतं ! केवळ राजवंशांत जन्मल्यानं राजेपणाचे गुण अंगीं येत नाहींत त्याचप्रमाणं केवळ समशेरीच्या बळावर सिंहासन बळकावल्यानंहि राजाचे गुण अंगीं उतरत नाहींत ! जनतेच्या हृदयसिंहासनावर अखंड विराजणारा महात्माच खरा सार्वभौम राजा ! मग त्याच्या माथ्यावर मुकुट असो वा नसो !

**कृतांत** : ( चिडून ) शिपायांनों ! ह्या उन्मत्ताचं माथं एकदम छाटून टाका !

[ शिपाई पुढे येत नाहींत. फक्त आपसांत कुजबुजतात.

**कृतांत** : हा देवावर्ताचा तख्तनशीन सम्राट् आज्ञा करीत आहे !

**कामिनी** : ही बेअदबी ?

**इंद्रजाल** : राजद्रोही रामोशानों ! ( तलवार उपसतो. )

**कृतांत** : मीच आधीं ह्या संजयाला. . . ( तरवार उपसून सिंहासनावरून उठतो. )

**धनंजय** : थांबा ! प्रथम माझ्या मानेवर ह्या तुमच्या तरवारीला धार द्या. अन् मगच माझ्या प्रेताला तुडवून युवराजांचे प्राण घ्या !

**कृतांत** : पोटचा गोळा आड येईल तर कांपूनच काढावा लागेल !

[ इतक्यांत 'दगा-दगा-बंडखोरांचा हल्ला आला'—असा एकच गिल्ला ऐकूं येतो.

**कामिनी** : (घाबरून) बंडखोरांचा हल्ला ?

[ पडद्यांत—संजीवनी: ' खेचा—त्याला सिंहासनावरून खालीं खेचा ! '

**कृतांत** : मला सिंहासनावरून खालीं खेचणार ? मीच ह्या बंडखोरांचे प्राण बाहेर खेचून काढतों—

[ कृतांत संजयाच्या अंगावर तरवार घेऊन धांवूं लागतो. तोंच दरबारी लोक त्याच्यावर तरवारी रोखतात. कृतांत हतबुद्ध होतो. इंद्रजाल कांहीं लोकां-सह पळ काढतो. कामिनीहि त्याच्या पाठोपाठ मुकुट घेऊन पळून जाते. इतक्यांत धारिणी, संजीवनी, शक्तिसिंह, चंडपाल, वगैरे प्रवेशतात.

**संजीवनी** : खेचा–सिंहासनावरून खालीं खेचा !

[ धारिणी कृतांताला सिंहासनावरून खालीं ओढते.

**कृतांत** : हें काय ? माझींच माणसं माझ्यावर उलटली !

**संजय** : आघाताला प्रत्याघात हाच निसर्गाचा सिद्धांत !

**धारिणी** : तुमच्याच महत्त्वांकाक्षेचा शेवट अशा राज्यक्रांतींत झाला !

**कृतांत** : इंद्रजाल ! कामिनी ! इंद्रजाल !...

**शक्तिसिंह** : आतां उगाच कशाला कंठशोष ?

**संजीवनी** : त्या तुमच्या जीवाला जीव देणाऱ्या जोडीदारांनीं मघांच जीव घेऊन पोबारा केला—

**संजय** : सार्वभौम सत्तेची नशा अजून निवळली नाहीं ?

**कृतांत** : तुझ्या कर्तृत्वाचा कैफ प्रथम उतरवतों पाहा !—

[ क्रोधानें बेफाम होऊन संजयाला वार करायला जातो. पण मध्येंच धनंजय आड येतो. चुकून त्याला वार लागून तो ठार होतो.

**धारिणी** : अरे देवा ! हें काय ? माझा धनंजय ठार झाला ?

**संजय** : अरेरे ! राक्षसी राज्यतृष्णेनं प्रत्यक्ष पोटच्या पोराचा घोट घेतला !

[ अकल्पित प्रकारामुळें सर्वजण स्तिमित होतात. पडदा पडतो.

[ ५ ]

जंगल-रस्ता. इंद्रजाल दोन मानकऱ्यांसह येतो.

**इंद्रजाल** : सांगितल्याप्रमाणं सारं करा. हा इंद्रजाल सिंहासनावर चढला कीं तुमचंहि भाग्य कळसाला चढलंच म्हणून समजा.

**१ मानकरी** : आपल्या भरंवशावर आम्हीं उभ्या जिंदगीचा जुगार खेळतों—

**२ मानकरी** : मग दैवाचे फांसे कसेहि पडोत !

[ जातात. इतक्यांत दुसऱ्या बाजूनें कामिनी मुकुट घेऊन येते.

**कामिनी** : मुत्सद्दी ग बाई मुत्सद्दी ! इथंदिखील खलबतं चाललींतच ना ?

**इंद्रजाल** : राजनिष्ठेचं व्रत प्राणान्तापर्यंत जिवाच्या करारावर पाळलंच पाहिजे.

**कामिनी** : खरंच, कृतांतदादाच्या हितासाठीं तुम्ही किति किती झटतां !

**इंद्रजाल** : माझ्या कर्तबगारीची खरी कसोटी तर आत्तांच आहे.

**कामिनी** : तें बरीक खरं. तिकडे केवढा हलकल्लोळ उडालाय् ! धनंजयाच्या मरणामुळं धारिणी वेडी झाली आहे...

**इंद्रजाल** : तशी ती पहिल्यापासूनच वेडी—

**कामिनी** : अन् कृतांतदादा संजयाच्या नजरकैदेंत आहे !

**इंद्रजाल** : संजयाच्या नजरकैदेंत ?

**कामिनी** : होय. ह्या प्रसंगीं प्राणदान दिलंत तर हा मुकुट अस्सा आपल्या डोक्यावर चढवायला दादा आनंदानं तयार होईल !

**इंद्रजाल** : खरं आहे.

[ कामिनी त्याच्या डोक्यावर मुकुट ठेवते.

**कामिनी** : अहाहा ! स्वारीला कसा पण शोभतो आहे हा मुकुट !

**इंद्रजाल** : भावी सम्राज्ञीला साजेसंच हें मनोराज्य चाललेलं आहे ! देवि !

**कामिनी** : इश्श ! मला देवी काय म्हणायचं तें ? मी ह्या चरणाची दासी आहे हो ! प्रेमाची दासी !

**इंद्रजाल** : मग ही प्रेमाची दासी माझ्यासाठीं काय करूं शकेल ?

**कामिनी** : सांगाल तें भयंकर दिव्य करून दाखवितें !

**इंद्रजाल** : मग एवढं कर ना ?

[ कामिनीच्या कानांत कांहीं तरी सांगूं लागतो. तोंच चार सशस्त्र शिपायां-सह राजबहादुर येतो.

**राजबहादुर** : ( शिपायांस एकीकडे ) तिकडे त्या झुडूपाआड दडून बसा. मी शीळ घातली कीं एकदम धांवून येऊन अचानक हल्ला चढवा. कामगिरी मोठ्या शिताफीनं हुषारीनं केली पाहिजे.

[ शिपायांसह जातो.

**कामिनी** : ( आश्चर्यानें ) इंद्रजाल, काय सांगतां हें ?

**इंद्रजाल** : ही एवढी धोंड काळाच्या खड्ड्यांत लोटून दिली कीं आपला अर्धा रस्ता मोकळा झाला.

**कामिनी** : पण हें भयंकर कर्म माझ्या हातून होईल का ?

**इंद्रजाल** : प्रेमाची दिव्य शक्ति ब्रह्मांडालाहि उलथून पाडील ! लाडके, हा राजमुकुट घे—ह्याचा तेजस्वी सहवास तुला खास स्फूर्तिदायकच होईल. एकदां तुझं मन निर्ढावलं कीं मग—

**कामिनी** : पण-पण मी खुनी होऊं ?

**इंद्रजाल** : राजकारणी व्यक्तीला शंभर खून माफ असतात ! तुला सम्राज्ञी-पद हवं ना ? मी सम्राट् इंद्रजाल अन् माझी लाडकी कामिनी सम्राज्ञी...

[ कामिनी दिङ्मूढ वृत्तीनें जाते. राजबहादुर हळूंच पुढें येतो.

**राजबहादुर** : जयजयकार असो ! सम्राट् इंद्रजालांचा जयजयकार असो !!

**इंद्रजाल** : राजबहादुर ! वा ! आत्तांच तुझी मला आठवण झाली होती—

**राजबहादुर** : हुजूर ! होणारच ! माझ्याशिवाय आपलं नडणारच !

[ शीळ घालतो. शिपाई धांवत येऊन इंद्रजालाला वेढतात. दोघे तरवार रोखतात. दोघे हातकड्या घालतात. राजबहादुर एक कागद खिशांतून काढतो.

**इंद्रजाल** : ( भांबावून ) हरामखोरांनों ! हा काय प्रकार ?

**राजबहादुर** : ( कागद दाखवीत शांतपणें ) हा महाराजांचा हुकूम ! सम्राट् ! आपलं सिंहासन कालदुर्गाच्या कैदखान्यांत तय्यार आहे ! पण ह्यांत एवढं आश्चर्य वाटण्याजोगं तरी काय आहे ? साराच जमाना बदलला ! सिंहा-सनाचीहि जागा बदलली !

**इंद्रजाल :** ( त्वेषानें ) कंगाल कुत्र्या ! माझ्या उष्टया तुकड्यावर वाढलेला तूं ! माझ्यापुढं वांकून वांकून तुझ्या कमरेचा कांटा ढिला झाला...

**राजबहादुर :** ( मोठ्यांदा हंसून ) होय. पण आज देवाच्याच न्यायाचा कांटा असा झुकला ! अरे गाढवा ! आम्ही खुशामती लोक व्यक्तीपुढं नव्हे तर त्या व्यक्तीच्या सत्तेपुढं वांकत असतो समजलास ? सत्तेचा शेंदूर उडून गेलेला पाजी फत्तर तूं ! आतां तुझी पूजा अशीच बांधायची ! महामूर्खा ! अधिकाराच्या जोरावर साऱ्या राज्यांत सैतानासारखा स्वैर धिंगाणा घालून लोकांना त्राहि भगवान् करून सोडलंस त्यावेळीं वर परमेश्वर जागा आहे, ही कल्पना तरी तुझ्या सडक्या मेंदूला शिवली होती का रे ? त्या सटवीच्या, कामिनीच्या जीवावर उड्या मारल्यास; पण आज नशिबानंच अशी कोलांटी उडी मारून तुझ्यावर कुरघोडी केली ! छे–छे ! असा प्रसंग वैऱ्यावरसुद्धां येऊं नये ! पण जाऊं दे झालं ! चला ह्याला घेऊन—

**इंद्रजाल :** याद राखा. कैदखान्यांत सडत कुढत मरण्यासाठीं हा इंद्रजाल जन्माला आलेला नाहीं. तुम्हां सर्वांचे मुडदे पाडीन अन् मगच मी शेवटचा श्वास सोडीन !

**राजबहादुर :** वा रे मर्द ! ( शिपायांस ) हुषारीनं चला हं ! ( इंद्रजालास खोट्या अदबीनें ) सम्राटांनीं असं ह्या वाटेनं चलावं !

[ सर्व जातात.

## [ ६ ]

दरबार–महाल. संजीवनी व चंडपाल प्रवेशतात.

**संजीवनी :** अजून वातावरण पुरतेपणीं निवळलेलं नाहीं. राजमुकुट लांबवून कामिनी बेपत्ता झाली आहे—

**चंडपाल :** अन् इंद्रजाल कैद झाला असला तरी त्याचे लोक केव्हां कसा दगा देतील, नेम नाहीं.

**संजीवनी :** युवराजांना कुठं एकटं सोडूं नको. त्यांच्याबरोबर सारखं राहा—

**चंडपाल :** ती फिकीर नको. सांवलीसारखा मी युवराजांच्या बरोबर आहे.

[ जातो. शक्तिसिंह येतो.

**शक्तिसिंह** : भयंकर बातमी ! इंद्रजाल तुरुंग फोडून फरारी झाला ! त्याचे लोक राजवाड्याच्या रोखानं येताहेत —

**संजीवनी** : सर्वांना सावध राहण्याचा इशारा द्या—

**शक्तिसिंह** : तो सगळा बंदोबस्त कडेकोट केला आहे.

**संजीवनी** : देवावर्तांचं नष्टचर्य अद्यापि संपलेलं दिसत नाहीं.

[ शक्तिसिंह जातो. इतक्यांत 'धनंजय-धनंजय' असा आक्रोश करीत वेडीपिशी धारिणी येते.

**संजीवनी** : छे-बाई ! बिचारीची ही अवस्था बघवत नाहीं.

**धारिणी** : धनंजय, बाळ कुठं आहेस तूं ? इतक्या हांका मारल्या तरी ओ देत नाहींस...अरे लबाडा ! त्या सिंहासनावर बसलास होय ? चल, उतर खालीं...हें सिंहासन आपलं नव्हे...संजयाचं आहे...ऊठ-ऊठ तेथून...तो बघ बागुलबुवा ! केवढं दांडगं पिशाच्च ह्या सिंहासनावर थैमान घालीत आहे ! तरवार लटकली आहे रे ह्याच्यावर...माझ्या चिमण्या राजा !...अगबाई, पण हें काय ? माझ्या बाळाचं रक्तबंबाळ तोंड...सिंहासनावर रक्ताचा सडा ? आधीं इकडे ये रे राजसा !...( धांवत जाऊन सिंहासनाला कवटाळते. डोकें आदळून खोक फुटते )...रक्त ! माझ्या बाळाचंच रक्त हें ! धांवा हो धांवा ! माझा लाडका लाल ठार झाला...

**संजीवनी** : देवि-देवि ! असं काय बरं ! तिकडे आंत चला—

**धारिणी** : तूं कोण ? देवता ? ह्या सिंहासनाची रक्षण करणारी तूं देवता ! स्वर्गांतून आलीस होय ? माझा चिमणा चिलया तिथं सुखरुप आहे ना ? ध्रुवबाळाशीं आनंदानं खेळतो ना तो ? बोल ना ? हो, पण तो पाहा, केवढा तेजस्वी तारा ! अरे गुलामा ! तिथं बसून माझ्याकडे बघून असा हंसतोस होय ? थांब आलें हं...

[ गवाक्षाकडे धांवूं लागते.

**संजीवनी** : आतां करूं तरी काय ? ह्यांचं हें वेड तर विकोपाला जात चाललं. युवराज कुठं गेले कळत नाहीं—

[ जाते. दुसऱ्या बाजूनें दबकत दबकत कामिनी येते. तिच्या एका हातांत कट्यार व दुसऱ्या हातांत राजमुकुट असतो. तिच्या पाठोपाठच लगबगीनें इंद्रजाल येतो.

**इंद्रजाल** : ( हलक्या पण कठोर आवाजांत ) कामिनी !

**कामिनी** : ( वळून पाहून ) कोण ? इंद्रजाल ! तुम्ही तर तुरुंगांत—

**इंद्रजाल** : तुरुंग फोडून बाहेर पडलों...

**कामिनी** : पण—

**इंद्रजाल** : चूप ! ती बघ धारिणी ! एकटीच आहे. आपलं काम पार पाड–

**कामिनी** : पण हें कसं निभणार माझ्याच्यानं ? जिवाचा थरकांप चाललाय्–

**इंद्रजाल** : तें कांहीं नाहीं चालायचं. माझ्यासाठीं हें करायलाच हवं तुला... माझ्या प्राणा !

[ इंद्रजाल जातो. धारिणी सिंहासनाच्या रोखानें येते. कामिनी चटकन् सिंहासनाआड लपते.

**धारिणी** : कुठं हो नेतां माझ्या वासराला ? बाळ, जाऊं नको रे ! अगबाई ! हें काय ? देखतां डोळां माझा बाळ ठार झाला ! कुणी माझ्या चिमण्या पोपटाच्या गळ्यावर समशेरीचा वार केला ?

[ कृतांत येतो.

**कृतांत** : क्षमा कर...देवते, ह्या नरराक्षसानंच पोटचा गोळा ठेचून टाकला !

**धारिणी** : तूं–तूं माझ्या बाळाच्या रक्तानं आपले हात रंगविलेस ? तूं माझ्या कलिजाला देवाघरीं धाडलंस ? आण, दाखव माझा बाळ—

**कृतांत** : देवि, माणसाची जात सांगणारा नरपशु मी ! दया कर माझ्यावर ! ...तुझ्या दोन पावलांचा आसरा...( तोंड झांकून घेऊन रडतो.)

**धारिणी** : ( भानावर आल्यासारखें करून ) तुम्ही ? तुम्ही ? नाथ–नाथ ! मला वेडीला क्षमा करा हो ! पण कृपा करून माझ्या दृष्टीपुढून निघून जा... माझ्या बाळाची मनोहर मूर्ति जीवाभावानं आळवीत मला एकटीच बसूं दे.

[ कृतांत जड पावलांनीं जातो. कामिनी पुढें येते. मुकुट सिंहासनावर ठेवते. आणि पाठीमागून येऊन धारिणीवर कट्यार उगारते तोंच धारिणी चटकन् तिचा हात धरते. कट्यार गळून पडते.

**कामिनी** : ( घाबरून ) धांवा हो धांवा...कुणीतरी सोडवा मला ह्या वेडीच्या तावडींतून...

**धारिणी** : मी वेडी ? होय़...माझ्या बाळाच्या शोकानं मी वेडीच झालें आहे...पण साऱ्या अघोर अनर्थाला कारण तूंच ! तूंच ह्या धारिणीच्या

दैवाचे धिंडवडे काढून तिला अशी दशा आणलीस !...पण ही कट्यार ! कशासाठीं ? माझा खून पाडण्यासाठीं ?...

**कामिनी** : वहिनी–वहिनी ! ह्या पापिणीला क्षमा कर ग ! क्षमा कर !

**धारिणी** : अखेर, अशी माझ्या जिवावर उठलीस ?...प्रत्यक्ष भावजयीचा खून करणारी कृत्या तूं ! पण नव्हे...एकापरीनं परोपकारी देवताच आहेस... घे ही कट्यार नि खुपस माझ्या काळजांत...( कट्यार कामिनीच्या हातीं देऊं लागते. ) दया कर माझ्यावर...काय ? नाहीं करणार दया ? मग मीच...

**कामिनी** : वहिनी–वहिनी—( धारिणीच्या हातून कट्यार हिसकावून घेऊन फेकून देते. ) ती कट्यार तुझ्या काळजांत तोंड खुपसून दडून बसेल पण माझ्या काळजाचे तुकडे तुकडे उडवील ग ! वहिनी, क्षमा कर, हें नीच कर्म मी आरंभलं खरं. पण तशी इच्छा माझी नव्हती...

[ सशस्त्र लोकांसह इंद्रजाल येतो.

**इंद्रजाल** : ह्या इंद्रजालाची होती. तुला आणि तुझ्याचबरोबर त्या तुझ्या नादान नवऱ्याला...कृतांतालाहि—

[ तरवार घेऊन धांवतो. कामिनी एकदम त्याच्या पायांना विळखा घालते.

**कामिनी** : म्हणजे ? तुम्ही दादालाहि ठार करणार ?

**इंद्रजाल** : अलबत् !

**कामिनी** : नका हो नका ! माझ्यावरच्या प्रेमासाठीं तरी—

**इंद्रजाल** : प्रेम ! मूर्ख पोरटे ! तुझ्यावर माझं स्वप्नांतसुद्धां प्रेम नव्हतं.

**कामिनी** : मग इतके दिवस प्रेमाचं नाटकच केलंत ?...

**इंद्रजाल** : नाटक ! माझ्या कपट–नाटकांत मला वेळोवेळीं उपयोग व्हावा म्हणूनच तुझ्यासारखं एक उल्लू प्रेमवेडं पात्र मी हाताशीं धरलं होतं इतकंच ! मुलुखावरून ओवाळून टाकलेली तूं उनाड मैना...( जोराची लाथ हाणून ) चल, सोड माझे पाय...

**कामिनी** : ( उठून त्वेषानें ) काळसर्पा ! अखेरघडीला असा उलटलास ! सैताना ! मला जगांतून उठवून उलट—

**इन्द्रजाल** : तुम्हां सर्वांना आज मी कायमचंच जगांतून उठविणार आहे ! एकाच सरणाच्या शय्येवर तुम्हाला काळनिद्रा घ्यायला लावून माझा सिंहासनाचा मार्ग मी मोकळा करणार आहे—

[ इतक्यांत कृतांत, शक्तिसिंह व चंडपाल येतात.

**कृतांत** : तुझा सिंहासनाचा मार्ग ? बदमाश !...

**शक्तिसिंह** : त्या मार्गावर आधीं तुझ्या मुर्दाड रक्ताचं रंग-शिंपणं करून—

**चंडपाल** : तुझ्याच हाडांची रांगोळी घालतों पाहा !

**इंद्रजाल** : कृतांता ! माझ्या मार्गांतली तुझी धोंड मसणवटींत गाडायला—

[ संजय येतो.

**संजय** : पण तुलाच प्रथम यमसदनाला धाडायला हा संजय आला आहे !

**इंद्रजाल** : ( कृतांतास ) नाहीं तुला, नाहीं मला ! पण ह्या कुत्र्याला हें सिंहासन मी मिळूं देणार नाहीं. तोडून फोडून ह्या तख्ताचीं शकलं शकलं उडवितों पाहा !

[ सिंहासन फोडण्यासाठीं धांवतो. संजय-शक्तिसिंह त्याला आडवितात.

**शक्तिसिंह** : चल हाट बाजूला ! तुझी अमंगळ सांवलीसुद्धां पाडूं नकोस त्या तख्तावर !

**इंद्रजाल** : तरवारीनं जगणारा हा इंद्रजाल—

**संजय** : आज असा तरवारीनंच मरणार !

[ चकमक झडते. चंडपाल-शक्तिसिंह इंद्रजालाचे लोकांना गारद करतात. संजयाच्या वारानें इंद्रजाल घायाळ होऊन पडतो. तोंच धारिणी, संजीवनी राजबहादुर वगैरे येतात.

**संजीवनी** : कर्तबगारीच्या घमेंडीनं मरणाऱ्या मर्कटा !

**राजबहादुर** : बेट्या, मरतेवेळीं तरी तोंडानं देवाचं नांव घे !

**इंद्रजाल** : मी मेलों तरी माझं पिशाच्च ह्या राजसिंहासनावर अखंड थैमान घालीत राहाणार !

[ इंद्रजाल तडफडून प्राण सोडतो.

**सर्वजण** : सम्राट् संजय महाराजांचा जयजयकार !

**संजय** : माझा जयजयकार बंद करा ! आजपासून देवावर्त स्वतंत्र, सार्वभौम, प्रजासत्ताक झाला आहे !

**धारिणी** : म्हणजे ?

**संजय** : देवावर्ताच्या राजसत्तेची शृंखला आज भग्न झाली !

**कृतांत** : संजय ! हा सम्राट्-मुकुट तुझ्या मस्तकावर चढवून आजवरच्या माझ्या पापांचं मला अंशतः तरी परिमार्जन करूं दे—

[ संजयाच्या मस्तकावर मुकुट ठेवूं लागतो.

**संजय** : थांबा, माझ्या मस्तकावर हा साम्राज्य-मुकुट चढवूं नका ! माझ्या जन्मसिद्ध हक्काच्या लढ्यापायीं कैक क्रांतिवीरांचं बलिदान झालं, तें हा राजमुकुट मी माझ्या मस्तकीं मिरवावा म्हणूनच का ? प्रजाजन हो ! तुमचीं पवित्र अंतःकरणं हेंच माझं सिंहासन ! तुमचे मंगल आशीर्वाद म्हणजेच माझा सम्राट्-मुकुट ! मी तुमचा राजा नसून तुम्हीच माझे राजे आहांत ! देवावर्ताचं हें सम्राट्-सिंहासन आजपासून लोक-सिंहासन झालं आहे !

**संजीवनी** : ( हर्षभरानें ) लोक-सिंहासन ! लोक-सिंहासन !!

**संजय** : ह्याच सिंहासनावर स्वातंत्र्यदेवतेचं मंगल अधिष्ठान झालेलं आहे ! देवावर्ताचा हा साम्राज्यमुकुट स्वातंत्र्य-देवतेच्या पुण्यचरणीं अर्पण असो !

[ मुकुट सिंहासनाच्या पायरीवर ठेवतो.

**शक्तिसिंह** : अहाहा ! ह्या जनता-जनार्दनाच्या सिंहासनापुढं—

**संजय** : सम्राटांचींहि मस्तकं अशीं आपोआपच नम्र होत असतात !

[ संजय व कृतांत सिंहासनाला त्रिवार अभिवादन करतात.

**संजीवनी** : प्रजेसाठीं फकीरी स्वीकारण्याची सद्बुद्धि सर्व राजेलोकांना होवो, एवढीच त्या जगन्नियंत्याच्या मंगल चरणीं प्रार्थना आहे !

**संजय** : बोला, स्वातंत्र्यदेवतेचा जयजयकार !

[ सर्व जयजयकार करतात. अकस्मात् सिंहासनाचे मागें तेजोमय वातावरणांत स्वातंत्र्यदेवतेची त्रिशूळधारी चतुर्भुज मूर्ति साकार प्रकटल्याचा आभास होतो. सर्व अभिवंदन करतात. पडदा पडतो.

# शुक्ल-वाङ्मय



नाटकें

सौभाग्यलक्ष्मी

सिंहाचा छावा

साध्वी मिराबाई

स्वर्गावर स्वारी

साक्षात्कार

सत्याग्रही

लोक-सिंहासन



## काव्य

कुमुदबान्धव

सुनीतिका

संगीतिका

रुपेरी रसधारा



## नाटिका

चार चान्दण्या

[ चार एकांकी नाटिकांचा संग्रह ]

नवल नगरची राजकन्या

जंगल्या भिल्लु

# शुक्ल-वाङ्मय



## कथासंग्रह

भरारी

कागदी बदाम

आठवा सर्ग



## विविध

प्रेमाच्या कानगोष्टी [प्रबंध]

कमलेची कहाणी [कादंबरी]



## बोलपट

ध्रुव

राजा श्रियाळ

देवयानी

अकरावा अवतार

नारद-नारदी

गोरा कुंभार

भक्तीचा मळा [ माळी ]

गजाभाऊ

[मूळकथा-श्री. बावडेकर व नाडकर्णी]

